शिक्षणखात्याची मंजुरी क्रमांक पा.पु.मं./१०९५/१६७६४/८-भा (मराठी-बा.भा.)/स (पु) दिनांक २-१-९६

इयत्ता आठवी

मराठी

# बालभारती



महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे.

प्रथमावृत्ती: १९९६
पुनर्मुद्रण : २००६



| | |
|---|---|
| मराठी भाषा समिती | : डॉ. मधुकर आष्टीकर, अध्यक्ष<br>डॉ. भाऊ मांडवकर, सदस्य<br>श्री. दया पवार, सदस्य<br>श्री. व्यंकटेश चौधरी, सदस्य<br>श्री. नरहर मंद्रुपकर, सदस्य<br>सौ. प्रतिभा जंगले, सदस्य<br>श्री. माधव राजगुरू, सदस्य-सचिव |
| संयोजन प्रमुख | : माधव राजगुरू, विशेषाधिकारी, मराठी विभाग |
| सहायक | : सौ. उषादेवी देशमुख, विषय सहायक, मराठी विभाग |
| चित्रकार | : श्री. श्रीमंत होनराव |
| मुखपृष्ठ | : मे. अल् प्रोसेस, मुंबई |
| कागद | : ६० जी.एस.एम. क्रीम वोव्ह. |
| अक्षरजुळणी | : मे. ट्रेन्ड्झ फोटो टाईप सेटर, फोर्ट, मुंबई-४०० ००१.<br>(कौटील्या टाईप, १४ पॉईंट/ १७ पॉईंट) |
| निर्मिती | : श्री. प्रमोद शिरोडकर, मुख्य निर्मिती अधिकारी<br>श्री. संजय कांबळे, निर्मिती अधिकारी |
| मुद्रणादेश | : N / Tec / 2006-07 (2.00) |
| मुद्रक | : बालाजी ऑफसेट प्रिंटर्स,<br>पेठ वडगांव, जि. कोल्हापूर ☎ : २४७१३३८ |
| प्रकाशक | : प्रमोद शिरोडकर,<br>प्र. नियंत्रक,<br>पाठ्यपुस्तक निर्मिती,<br>प्रभादेवी, मुंबई - ४०० ०२५. |

# प्रतिज्ञा

भारत माझा देश आहे.
सारे भारतीय माझे
बांधव आहेत.
माझ्या देशावर माझे प्रेम आहे.
माझ्या देशातल्या समृद्ध आणि
विविधतेने नटलेल्या परंपरांचा मला अभिमान आहे.
त्या परंपरांचा पाईक होण्याची पात्रता
माझ्या अंगी यावी म्हणून मी सदैव प्रयत्न करीन.
मी माझ्या पालकांचा, गुरुजनांचा
आणि वडीलधाऱ्या माणसांचा मान ठेवीन
आणि प्रत्येकाशी सौजन्याने वागेन.
माझा देश आणि माझे देशबांधव
यांच्याशी निष्ठा राखण्याची
मी प्रतिज्ञा करीत आहे.
त्यांचे कल्याण आणि
त्यांची समृद्धी
ह्यांतच माझे
सौख्य सामावले
आहे.

# प्रस्तावना

'राष्ट्रीय शैक्षणिक धोरण-१९८६' अनुसार महाराष्ट्र राज्यात 'प्राथमिक शिक्षण अभ्यासक्रम —१९८८' तयार करण्यात आला. या शासनमान्य अभ्यासक्रमावर आधारित मराठी भाषा विषयाची इयत्ता पहिली ते आठवीची नवीन 'बालभारती' माला १९८९-९० या शालेय वर्षापासून पाठ्यपुस्तक मंडळ क्रमश: प्रकाशित करत आहे. या मालेतील शेवटचे आठवे पुस्तक आपल्या हाती देताना आम्हांला विशेष आनंद वाटतो.

सहाव्या इयत्तेपासून सुरू झालेल्या शालेय अभ्यासक्रमाचा उच्च प्राथमिक स्तर या इयत्तेत संपतो आणि पुढील वर्षापासून शालेय अभ्यासक्रमाचा माध्यमिक स्तर सुरू होतो, हे लक्षात घेऊन या पुस्तकाची रचना केलेली आहे.

विद्यार्थ्यांच्या व्यक्तिमत्त्व विकासाबरोबरच त्यांच्यात वाङ्मयीन अभिरुची निर्माण व्हावी, आपली मातृभाषा, समाज व राष्ट्र यांच्याविषयी त्यांच्या मनात अस्मिता जागृत होऊन ती वृद्धिंगत व्हावी, सामाजिक व नैतिक जाणिवा संपन्न व्हाव्यात अशा व्यापक दृष्टीने या पुस्तकातील पाठांची निवड केलेली आहे. प्रत्येक पाठाच्या शेवटी दिलेले प्रश्न, स्वाध्याय व उपक्रम मातृभाषेच्या अभ्यासक्रमाची उद्दिष्टे साध्य करण्यास उपयोगी ठरतील.

कलात्मक आणि सौंदर्यात्मक दृष्टी विकसित व्हावी, यासाठी दोन रंगीत चित्रसंच या पुस्तकात दिले आहेत.

आठव्या इयत्तेत अपेक्षित असलेले व्याकरण पाठानंतर लगेच देण्यात आलेले आहे.

विद्यार्थ्यांना शब्दकोश पाहण्याची सवय लागावी, म्हणून पुस्तकाच्या शेवटी गद्य व पद्य पाठांतील शब्दांचे अर्थ शब्दकोश पद्धतीने दिलेले आहेत.

महाराष्ट्राच्या सर्व भागांतील अनुभवी शिक्षक व शिक्षणतज्ज्ञ यांच्याकडून या पुस्तकाचे समीक्षण करण्यात आले व त्यांच्याकडून आलेले अभिप्राय व सूचना यांचा सांगोपांग विचार करून पुस्तकाला अंतिम रूप देण्यात आले आहे.

मंडळाची मराठी भाषा समिती व चित्रकार यांच्या आस्थापूर्वक परिश्रमांतून हे पुस्तक तयार झाले आहे. मराठी भाषा समितीला हे पुस्तक तयार करताना निमंत्रित सदस्य श्री. व. द. देसाई यांचे बहुमोल सहकार्य लाभले. मंडळ या सर्वांचे मन:पूर्वक आभारी आहे.

या पाठ्यपुस्तकाचे अध्ययन व अध्यापन दर्जेदार व्हावे, यासाठी मंडळाने सदर पाठ्यपुस्तकाची 'अध्यापन-पुस्तिका' प्रकाशित केली आहे. शिक्षकांनी सदर पुस्तिकेचा अवश्य उपयोग करून घ्यावा.

विद्यार्थी, पालक व शिक्षक या पुस्तकाचे स्वागत करतील, अशी आशा वाटते.

(डॉ. वसंत काळपांडे)
संचालक
महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व
अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे-४११ ००४.

पुणे :
दिनांक : ६ डिसेंबर, १९९५
१५ मार्गशीर्ष, शके १९१७

# अनुक्रमणिका

## गद्य विभाग

## पद्य विभाग




### ऋणनिर्देश

खालील प्रकाशक/हक्कदारांनी आपले पाठ पुस्तकात समाविष्ट करण्यासाठी परवानगी दिली, त्याबद्दल आम्ही त्यांचे ऋणी आहोत.

| पाठाचे नाव | संदर्भ/प्रकाशक |
|---|---|
| १. वीर बापू गायधनी | 'परजीवितरक्षण-यज्ञ' वीर बापूराव गायधनी स्मारक समिती, नाशिक. |
| २. उद्योगमहर्षी वालचंद हिराचंद | 'अक्षय' - मानसन्मान प्रकाशन, पुणे |



# १. भारत माझा देश आहे

**यदुनाथ थत्ते (यदुनाथ दत्तात्रय थत्ते - १९२२-१९९८)**

समाज प्रबोधनासाठी सेवाभावी वृत्तीने काम करणारे कार्यकर्ते. राष्ट्रीय एकात्मतेसाठी सानेगुरुजींनी स्थापन केलेल्या 'आंतरभारती'चे सचिव. 'साधना' साप्ताहिकाचे माजी संपादक. त्यांनी मुलांसाठी अनेक पुस्तके लिहिली आहेत. 'आपला मान-आपला अभिमान', 'सोन्या', 'जग्गूबाबा', 'पुढे व्हा', 'तपश्चर्या', 'विनोबा भावे', 'इच्छा', 'आपली जडण-घडण' ही त्यांची काही पुस्तके. 'प्रतिज्ञा : पाठ्यपुस्तकातील' या पुस्तकातून हा उतारा घेतला आहे.

या पाठात 'प्रतिज्ञे'च्या संदर्भात एक नवी दृष्टी लेखकाने दिली आहे.

---

एकदा एका शाळेत गेलो होतो. शाळेची प्रार्थनेची वेळ होती. मुले पुस्तकातील प्रतिज्ञा म्हणताहेत हे पाहून मी सुखावलो. मुले प्रार्थनेहून परतली. त्यांना मी विचारले, "पाठ्यपुस्तकातल्या प्रतिज्ञेत पहिले वाक्य आहे, भारत माझा देश आहे. होय ना ?"

मुले म्हणाली, "होय, तेच पहिले वाक्य आहे."

"भारत 'आपला' देश असे न म्हणता 'माझा' का बरं म्हटलं असेल ? प्रतिज्ञा तयार करणाऱ्याला का 'आपला' शब्द सुचला नसेल ?"

मुले बरीच विचारात पडली. त्यांना प्रश्न नीट उमजला नसावा.

तेव्हा मी म्हणालो, "आपल्या लोकांची मानसिकता लक्षात घेऊनच त्यांनी 'आपला' शब्द वापरण्याऐवजी 'माझा' हा शब्द वापरला असणार."

मुले म्हणाली, "म्हणजे ?"

मी सांगितले, "वस्तू 'माझी' असं वाटतं, तेव्हा आपण तिची जितकी काळजी घेतो, तितकी 'आपली' म्हटल्यावर घेतोच असं नाही; म्हणून 'माझा' असा शब्द इथे वापरला, असं वाटतं का?"

मुले म्हणाली, "बरोबर आहे. माझं घर-अंगण म्हटलं, की ते मी स्वच्छ ठेवतो. रस्ता मात्र आपला; म्हणून त्याच्यावर आपण घरातील घाण टाकतो !"

मी सांगितले, "माणसाचं मन जसजसं मोठं होतं तसतसं 'माझी' ही कल्पनाही

विस्तारत जाते. ते 'हे विश्वचि माझे घर' असं म्हणण्याइतकं मन मोठं करतात आणि त्यामुळे सगळीकडे जीवन स्वच्छ, निर्मळ व्हावे म्हणून प्रयत्न करतात. गाडगेमहाराज, सेनापती बापट, विनोबा, सानेगुरुजी, महात्मा गांधी हातात झाडू घेतात व इतरांनाही घ्यायला शिकवतात. 'भारत माझा देश आहे' या वाक्यातील 'माझा' शब्द आपल्या मनानुसार लहान-मोठा होत असतो; म्हणूनच 'मनं लहान असतील, तर देशाच्या सीमा आक्रसतील' असं विनोबा म्हणाले होते.''

मुले कुतूहलाने ऐकत होती.

मी विचारले, ''भारत तुमचा देश आहे असे तुम्ही म्हणता. कशावरून तुमचा? तुम्ही म्हणता म्हणून ? उद्या 'माझी' पिशवी तुम्ही 'तुमची' म्हणाल. होईल तुमची? मग देश तुमचा कसा झाला ?''

असा प्रश्न मुलांच्या मनात कधीच आला नव्हता. एक मुलगा धिटाईने म्हणाला, ''मी इथे राहतो ना, त्यामुळे देश 'माझा' आहे.''

''पण इथं काय फक्त तुम्ही राहता ? पशु-पक्षी, जीव-जंतू, वृक्ष-वनस्पती सगळे इथं राहतात. ते कोणी 'भारत माझा देश आहे' असं म्हणतात ?''

एक मुलगी म्हणाली, ''पण त्यांना बोलता कुठं येतं ? त्यांची भाषा आपल्याला कुठं समजते ? कदाचित तेही असं म्हणत असतील !''

''भरतपूरच्या अभयारण्यात जगातून हजारो पक्षी येतात. त्यांनी पासपोर्ट-व्हिसा मागितल्याचं तुम्ही कधी ऐकलंत ? देश ही कल्पना त्यांना नसते. माणसानं ती केली आहे. प्राण्यांना ती नाही...''

''पण भारत म्हणजे काय ?''

''अमुक अक्षांशापासून तमुक अक्षांशापर्यंत आणि अमुक रेखांशापासून तमुक रेखांशापर्यंत जो भूभाग आहे त्यास भारत असं म्हणतात.'' एका मुलाने पाठ केलेले उत्तर दिले.

दुसरा मुलगा म्हणाला, ''त्या तिथं नकाशात भारत आहे.''

''ठीक, पण तुम्हांला ठाऊक आहे जगातले लोक काय म्हणतात भारताबद्दल ते?''

''काय म्हणतात ?''

''ते म्हणतात, भारत म्हणजे पवित्र वचने म्हणणाऱ्या लोकांचा ओंगळवाणा देश! आमच्या एका नाटकात एक गमतीचा संवाद आहे : एक पात्र दुसऱ्या पात्राला विचारतं – 'रात्रीच्या वेळी गाव कोणीकडे आहे कसं ओळखावं ?' दुसरं पात्र सांगतं, 'दिव्याचं टिमटिमणं दिसलं, की समजावं, गाव तिकडे आहे.' मग पुन्हा प्रश्न – 'गाव जवळ आलं कसं ओळखावं?' उत्तर – 'कुत्र्यांच्या भुंकण्याचा आवाज आला, की समजावं, गाव जवळ आलं.' पुन्हा प्रश्न – 'नेमकं गावात आलो कसं ओळखावं?' उत्तर – 'नाकाला फडकं लावावं लागलं, की समजावं गावात पोचलो !''

मुले मनापासून हसतात.

मी सांगतो, ''भारत 'माझा' देश आहे असं आपण म्हणालो तर लगेच आपल्या मनात आलं पाहिजे, जर भारत 'माझा' असेल, तर इतका घाणेरडा कसा ?''

एक मुलगा म्हणाला, ''आम्ही काय करावं ?''

मी सांगितले, ''गाडगेमहाराज सांगत, बाबांनो, निदान घाणीवर माती तरी टाका. माती टाकली तर ओंगळवाणेपणा जाईल. घाणीतली खतद्रव्ये जमीन पुष्ट करतील. घराचे संडास, गॅस प्लँट यांच्या साह्याने ओंगळपणा घालवता येईल आणि 'भारत माझा देश आहे ' असं म्हणताना आपली मान खाली जाणार नाही. पण...''

'पण...' असं मी म्हणताच मुलांनी कान टवकारले; कारण असा 'पण' शब्द पुढे कोणते तरी विरुद्ध अर्थाचे विधान येणार आहे असे सुचवतो.

मी मुलांना विचारले, ''तुम्ही कोणी कधी रेल्वेनं प्रवास केला आहे का ?''

बऱ्याच मुलांनी हात वर केले. तेव्हा मी विचारले, ''खिडकीजवळ काय लिहिलेलं असतं, ते तुम्ही वाचलं आहे ?''

एक मुलगा म्हणाला, ''हो. 'थुंकू नका' असं लिहिलेलं असतं.''

मी सांगितले, ''एकदा एक मनुष्य डब्यातच थुंकला, तेव्हा मी त्याचं लक्ष त्या 'थुंकू नका'कडे वेधलं. त्याला राग आला. तो म्हणाला, 'गाडी काय तुमच्या बापाची आहे? गाडी तुमच्या बापाची नाही, माझ्याही बापाची नाही. मग घाण केली, तर कुठे बिघडलं?' मी म्हणालो, 'माझ्या बापाची नाही; तुमच्या बापाची नाही; पण मग स्वच्छ तर ठेवाल?' देश 'माझा' म्हणण्यामागे ही भूमिका आहे 'भारत माझा देश आहे' म्हणताना कधी तुमच्या मनात त्याप्रमाणे आलं का ?''

मुले मुकाट बसली, पण असे काही आपल्या मनात यायला पाहिजे होते असे त्यांना वाटले असावे.

मी पुन्हा विचारले, ''हा देश जर आपला, तर हे डोंगर टक्कल पडल्यासारखे का



दिसतात ? आपण राष्ट्रगीतात 'सस्यश्यामला' असे म्हणून मातेला वंदन करतो ना ? मग ती सस्यश्यामला व्हावी; म्हणून आपण खटपट करायला नको? आपण मारे छान छान कपडे घालायचे आणि भारतमातेला मात्र असं उघडंबोडकं ठेवायचं ?''

मुले गंभीर झाली. एक मुलगा म्हणाला, ''भारत माझा देश आहे, याचा असा अर्थ आम्हांला कोणी पूर्वी समजावलाच नव्हता. भारत माझा देश आहे हे आता अधिक समजून-उमजून आम्ही म्हणू.''

मी म्हणालो, ''आपण काही नुसतं तोंडानं बोलत नसतो. आपले डोळे, चेहरा, हात... सगळं व्यक्तित्वच बोलत असतं. मी आता बोलतो आहे. तुम्हांला विरुद्ध दिशेकडे तोंड करून बसवलं तरी तुम्हांला ऐकू येईल की नाही ?''

एक मुलगा म्हणाला, ''येईल की ! पण आम्हांला भाषण नुसतं ऐकायचं नसतं पाहायचंही असतं ना!''

''पं. भीमसेन जोशी गाणं गातात तेव्हा त्यांचं सबंध शरीर, प्रत्येक अवयव गात असतो. पाहिलं आहे ना ? टेलिफोनवर माणसं कशी बोलतात हे तुम्ही पाहिलं आहे?''

एक मुलगा म्हणाला, ''पाहिलं आहे की.''

''पलीकडून ऐकणाऱ्याला तुम्ही दिसता का ?''

''कसे दिसणार ? ... टेलिफोनवरून आपण बोलत असतो ना!''

''पण टेलिफोनवर बोलतानाही माणसं हातवारे करत असतात. पाहिलं आहे ?''

''हो, हो, आम्ही पाहिलं आहे ! मजा वाटते ते पाहून.''

''अरे, त्यांचंच कशाला, तुमचा परीक्षेत पहिला नंबर आला, तर तुमचे डोळे लुकलुकतात, तुमचा चेहरा खुलतो, पाय जणू नाचू लागतात. तुम्ही तोंडानं पहिला नंबर आला असं सांगता, त्याच्या आधीच बाकीची इंद्रियं तुमचा आनंद व्यक्त करतात.''

''होय!''

''मग 'भारत माझा देश आहे' असं नुसतं पोपटासारखं तोंडानं म्हणणार की तुमच्या सर्व इंद्रियांतून ही भावना व्यक्त होणार ?''

मुले म्हणाली, ''आम्ही पोपट थोडेच आहोत ?''

''शाळा म्हणजे बोलके पोपट तयार करण्याचा कारखाना नसतो. आपण शब्द मनापासून उच्चारतो. याचाच अर्थ पूर्ण समजून-उमजून, सर्वस्वासह आपण ते उच्चारतो. आपण 'भारतमाता की जय' म्हणतो, 'वंदे मातरम' म्हणतो, त्या त्या वेळी

आपल्या मनापुढे आजचा भारत आणि उद्याचा आदर्श भारत उभा राहिला पाहिजे.''

''होय सर!'' मुले उत्साहाने म्हणाली आणि आपल्या वर्गाकडे गेली.

**प्रश्न :**

खालील प्रश्नांची उत्तरे प्रत्येकी चार ते पाच वाक्यांत लिहा.

१. 'भारत माझा देश आहे' या वाक्यात 'आपला' ऐवजी 'माझा' हा शब्द का वापरला आहे?

२. 'भारत म्हणजे पवित्र वचने म्हणणाऱ्या लोकांचा ओंगळवाणा देश', असे काही लोक म्हणतात, ते बरोबर आहे का ?

३. देशातील घाणेरडेपणा दूर करण्यासाठी आपणांस काय करता येईल ?

४. हा देश जर आपला तर हे डोंगर टक्कल पडल्यासारखे का दिसतात ? असा प्रश्न निर्माण करून लेखकाने काय सूचित केले आहे ?

५. आपले सगळे व्यक्तित्वच बोलत असते म्हणजे काय ?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. खालील वाक्यांचे थोडक्यात स्पष्टीकरण करा.

अ. 'माणसाचं मन जसजसं मोठं होत जातं, तसतसं 'माझी' ही कल्पनाही विस्तारत जाते.'

ब. 'शाळा म्हणजे बोलके पोपट तयार करण्याचा कारखाना नसतो.'

२. पाठ्यपुस्तकातील प्रतिज्ञेतील प्रत्येक वाक्याचा अर्थ खुलासेवार समजून घ्या. त्यासाठी यदुनाथ थत्ते यांचे 'प्रतिज्ञाः पाठ्यपुस्तकातील' हे पुस्तक वाचा.

३. खालील वाक्ये आपल्या वहीत शुद्ध रूपात लिहून घ्या. त्यांचा अर्थ समजावून घ्या.

अ. 'भारत माझा देश आहे' या वाक्यातला 'माझा' हा शब्द आपल्या मनानुसार लहान-मोठा होत असतो.

ब. आपण राष्ट्रगीतात 'सस्यश्यामला' असे म्हणून मातेला वंदन करतो ना ? मग ती सस्यश्यामला व्हावी; म्हणून आपण खटपट करायला नको ?

क. आपण 'भारतमाता की जय' म्हणतो, 'वंदे मातरम' म्हणतो, त्या त्या वेळी आपल्या मनापुढे आजचा भारत आणि उद्याचा आदर्श भारत उभा राहिला पाहिजे.

४. हा पाठ संवादात्मक आहे. त्यातील भाषाशैलीचे स्थूल स्वरूप समजावून घ्या.

५. मी माझ्या देशासाठी हे अवश्य करीन –

- घरात टी. व्ही., रेडिओचा आवाज मर्यादित ठेवीन.
- रस्त्यावर थुंकणार नाही.
- शाळेच्या भिंतीवर काहीही लिहिणार नाही.
- शाळेच्या बागेतील फुले, पाने, फांद्या इत्यादी तोडणार नाही.
- वर्गात किंवा सार्वजनिक ठिकाणी कचरा करणार नाही.
- सार्वजनिक मालमत्तेचे नुकसान करणार नाही. (उदा. रस्त्यांवरील दिव्यांना दगड मारणे, ग्रंथालयातील पुस्तकांची पाने फाडणे इत्यादी.)
- सहलीला गेल्यावर ऐतिहासिक ठिकाणी स्वतःचे नाव लिहिणार नाही.
- माझ्या वाढदिवशी एक झाड लावीन आणि त्याचे संगोपन करीन.
- सत्कारासाठी, शुभेच्छांसाठी, फोटोला घालण्यासाठी वापरलेली फुले इतरत्र फेकून न देता किंवा नदीच्या पात्रात न टाकता, त्यापासून खत तयार करीन किंवा झाडांच्या बुंध्याशी पाडून टाकीन.

**व्याकरण : उजळणी**

१. राजारामाने पटकन दादा पाटलाचे पाय धरले.
या वाक्यातील कारकार्थ आणि उपपदार्थ ओळखा. त्यातील कारक विभक्ती कोणत्या व उपपद विभक्ती कोणत्या ते सांगा.

२. खालील वाक्यांचे प्रयोग ओळखा.
   १. सावळ्याने कुऱ्हाड हातात घेतली.
   २. राजाराम चयावया करू लागला.
   ३. आम्ही लोक नावाला फक्त सुशिक्षित आहोत.

३. खालील वाक्यातील धातुसाधिते ओळखा.
पत्र वाचताना माझे डोळे भरून आले.





# २. वीर बापू गायधनी

प्रस्तुत उतारा वीर बापूराव गायधनी स्मारक समिती, नाशिक यांनी प्रकाशित केलेल्या वीर बापूराव गायधनी रौप्यस्मृतिग्रंथ 'परजीवितरक्षण-यज्ञ' या पुस्तकातून संकलित करून घेतला आहे.

या पाठात दुसऱ्यांचे जीव वाचवण्यासाठी स्वत:चे प्राण अर्पण करणाऱ्या 'बापू गायधनी' यांच्या साहसी व वीर वृत्तीचा परिचय करून दिला आहे.

---

काही वर्षांपूर्वी नाशिक शहरात घडलेला हा प्रसंग. आजही सर्वांना स्तिमित करून जाणारा आहे. ती एक काळरात्र ठरली होती. दिवसभर दमून रात्रीला विसावा घेणारे जीव गाढ झोपेत असता एकदम घणाण् घणाण् घंटा वाजू लागली. त्या घणाघाती आवाजाने रात्रीची शांतता दुभंगली. लोक खडबडून जागे झाले. काही खिडक्यांकडे धावले, काही घरांतून बाहेर रस्त्यावर आले. पाहतात तो काय ? समोर एका दुमजली इमारतीला प्रचंड आग लागली होती. त्या इमारतीत अनेक बिऱ्हाडे वास्तव्याला होती. त्या इमारतीत एकच हलकल्लोळ माजला होता. आगीचे लोळ इमारतीत आत आत शिरत होते आणि आतले लोक जीव मुठीत धरून बाहेर धाव घेत होते. आत अडकलेले लोक जिवाच्या आकांताने आरडाओरडा करत होते. आगीच्या ज्वाला टाळत मिळेल त्या वाटेने आपला जीव वाचवत ते रस्त्यावर येत होते. खाली चौकाच्या सोप्यात गाईगुरे बांधलेली होती. जनावरे दाव्याला हिसके मारून आपला जीव वाचवण्याचा प्रयत्न करत होती.

वरच्या मजल्यावर काही मुले अडकून पडली होती. खिडकीशी येऊन ती मुले सगळी शक्ती एकवटून मदतीसाठी आकांत करत होती. त्यात एव्हाना रस्त्यावर प्रचंड गर्दी गोळा झालेली होती; अग्निशामक दलाची गाडी आग विझवण्याचा आटोकाट प्रयत्न करत होती; पण आगीचे प्रचंड लोळ विझवणे अशक्य होत होते.

दुसऱ्या मजल्यावर अडकलेली मुले 'आई ! आई !' म्हणून आर्त हाक मारत होती. लोकांची हृदये करवतीने कापल्यासारखी घायाळ होत होती; पण करणार काय ? कोण



धजणार त्या आगीत शिरायला ? आगीत ? नव्हे मृत्यूच्या जबड्यातच म्हणाना ! त्या मुलांची माता बाहेर धावत आलेली होती. ती आपल्या पिलांच्या आर्त हाकेने वेडी झाली. मुलांच्या हाकेला ओ देत ती त्या आगीत शिरायला धावली. लोकांनी तिला अडवले. एकाने तर तिचा हात घट्ट पकडून तिला मागेच खेचले. ती रडत होती, ओरडत होती. वेड्यासारखी एकटक आपल्या त्या पिलांकडे केविलवाणी बघत होती. "वाचवा हो माझ्या पिलांना !" ती ऊर बडवत लोकांना विनवण्या करत होती. जनसमुदायाचे हृदय विदीर्ण होत होते; पण मृत्यूला उघड्या डोळ्यांनी कवटाळण्याचे धैर्य करून त्या मुलांना वाचवायला कुणी धजेना.

तेवढ्यात एक तरुण तिथे धावत आला. अग्निशामक दलाची घणाण् घणाण् आवाज करणारी संकटसूचक घंटा त्याने ऐकली होती. झोप बाजूला सारून तो त्या आग लागलेल्या इमारतीकडे वेगाने आला होता. प्राणिमात्रांवर दया करावी, प्रसंगी आपले प्राण वेचूनदेखील इतर प्राणिमात्रांचे जीव वाचवावेत, ही भूतदया शिकवणाऱ्या आपल्या संस्कृतीचे जणू बाळकडूच तो प्याला होता. त्याने काचा कसला आणि त्या

आगीत तो बाणासारखा शिरला. जनसमुदायाच्या डोळ्यांचे पाते लवते न लवते तोच तो तरुण भरभर त्या इमारतीच्या वरच्या मजल्यावर पोहोचला. आगीचे चटके आणि कोंदलेल्या धुराने गुदमरणारा श्वास यांची पर्वा न करता तो तरुण त्या मजल्यावर अडकलेल्या मुलांपाशी पोहोचला.

जमलेली बघ्यांची गर्दी थक्क झाली. ''कोण हा स्वत:च्या प्राणांची आहुती देणारा वेडा तरुण ?'' ती गर्दी परस्परांना विचारू लागली. ''हा तर बापूराव गायधनी !'' कुणीतरी ओरडले, ''जिना पेटला आहे, कसा वाचवणार हा त्या मुलांना ?''

दुसऱ्या मजल्याला आता आगीने पूर्ण वेढलेले होते. जिना जळून कोसळला होता. काय करावे? त्या तरुणाने लगेच एकेका गादीत एकेका मुलाला गुंडाळले आणि खिडकीतून लोकांना हाक दिली.

''मी या गादीत मुलांना गुंडाळले आहे. झेलून घ्या त्यांना.'' गर्दीला एकदम भान आले. त्या तरुणाच्या समयसूचकतेचे जनसमुदायाला अपार कौतुक वाटले. त्यांनी वरून फेकलेल्या गादीतील मुलांना अलगद झेलले. मुले वाचली ! त्यांची आई आनंदली ! मुलांना पोटाशी घेऊन ती पटापट पापे घेऊ लागली. रडता रडताही तिला आनंद झाला.



पण त्या आत शिरलेल्या तरुणाचे काय ? जनसमुदाय त्या आगीत गुरफटलेल्या तरुणाकडे असहायपणे पाहत होता.-'खरा वीर शोभतोस!' प्रत्येक ओठातून उत्स्फूर्तपणे शब्द फुटत होते. तो तरुण — बापूराव गायधनी — कृतार्थतेने नि:श्वास टाकत होता. कृतकृत्य झाल्याचे विलक्षण समाधान त्याच्या चेहऱ्यावर विलसत होते. त्या पेटलेल्या आगीतून त्याने मुसंडी मारत बाहेर धाव घेतली. बापूरावाचे अंग ठिकठिकाणी भाजून निघाले होते. डोक्याचे केस अर्धवट जळाले होते. चेहरा विद्रूप दिसत होता. जनता त्या वीरापुढे नतमस्तक झाली. त्याला त्वरित दवाखान्यात न्यायला काही लोक पुढे आले.

तोच चौकाच्या सोप्यातून एका गाईचा हंबरडा बापूच्या कानी पडला. बापूचे हृदय त्या हंबरड्याने हेलावले. लोकांच्या अडवण्याला पार झुगारून तो वीर पुन्हा त्या आगीत शिरला. काही करून त्या गाईला वाचवायचे होते.

बापूराव गाईजवळ पोहोचला. अंगाला आगीचे चटके बसत होते. काही गुरांना त्याने मोकळे केले; पण एका गाईच्या दाव्याची गाठ सुटेना, काय करावे ? बापूरावाने अंगातले उरलेसुरले सगळे बळ एकवटले आणि आवेशात दावे जोरात ओढले. खुंट्यासहित ते दावे हाती आले. गाय मोकळी झाली. गाईला वाचवून त्या तरुणाने आपले 'गायधनी' हे आडनाव सार्थ केले. आगीच्या भयंकर जखमांनी विव्हळणारा



बापूराव त्या अग्निप्रलयातून पुन्हा बाहेर आला. आपल्या पिलांना पोटाशी घेऊन ती माता बापूरावाकडे कृतज्ञतेने बघत होती. त्यांना वाचवणारा तो देवदूत जवळ येताच ती माता डोळ्यांत आसवे आणून त्याच्याकडे पाहत राहिली. ती माता त्या तरुणापुढे वाकणार, तोच बापूराव बेशुद्ध होऊन खाली कोसळला.

गर्दीतील काही लोकांनी त्याला उचलले. गर्दी हटवत दवाखान्यात नेले. बापूराव खूपच जळाला होता. त्याची शुद्ध हरपली होती. डॉक्टरांनी प्रयत्नांची शिकस्त केली; पण भयंकर जखमांनी विव्हळणाऱ्या बापूरावाला ते वाचवू शकले नाहीत. इतरांचे प्राण वाचवण्यासाठी आपले प्राण बापूरावाने वेचले. भूतदयेवर आधारलेल्या भारतीय संस्कृतीची शान बापूरावाने राखली. बापूराव नश्वर जग सोडून गेला आणि अमर झाला.

सारे नाशिक शहर हळहळले. कुणालाही कित्येक दिवस अन्न गोड लागले नाही. सगळ्या शहरालाच जणू सुतक पडले होते. लोक त्या वीराच्या बहादुरीचे पवाडे गात होते. लोकांनी बापूराव गायधनीचे उचित स्मारक नाशकात उभारले. 'वीर' ही बहुमानाची पदवी दिली. महात्मा गांधींनीदेखील हे वृत्त कळताच 'धन्य त्याचे माता पिता' म्हणून गायधनी कुटुंबाची प्रशंसा केली. त्या वीराच्या मृत्यूने महात्माही हळहळला !

आत्मबलिदानाने इतरांचे जीवन वाचवणारा बापूराव गायधनी, वीर बापूराव गायधनी म्हणून जनतेच्या अंतःकरणात आदराचे स्थान कायमचे मिळवून गेला.

नाशिक येथे वीर बापूराव गायधनी स्मारक समितीच्या वतीने प्रतिवर्षी वीर व साहसी व्यक्तीला पारितोषिक देऊन त्यांचा गौरव केला जातो.

धन्य भारत देश आणि धन्य ती भूतदया शिकवणारी भारतीय संस्कृती !

**प्रश्न :**

खालील प्रश्नांची थोडक्यात उत्तरे लिहा.

१. ती एक काळरात्र ठरली होती ! असे लेखकाने का म्हटले आहे ?

२. आगीतून मुलांना वाचवण्यासाठी बापू गायधनीने काय केले ?

३. आगीतून मुलांना वाचवून बाहेर आलेला बापू गायधनी पुन्हा आगीत का शिरला?

४. बापू गायधनी याचे लोकांनी कोणत्या शब्दांत कौतुक केले ?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. काळरात्र ठरणे, जीव मुठीत धरणे, प्राणांची आहुती देणे, कृतकृत्य होणे, नतमस्तक होणे या वाक्प्रचारांचा अर्थ सांगा व स्वत:च्या वाक्यांत उपयोग करा.

२. तुम्ही पाहिलेल्या एखादया अपघाताचे २५ ते ३० वाक्यांत वर्णन लिहा.

३. संकटात सापडलेल्या मित्राला आपण कसे वाचवले ? हे तुमच्या घरी पत्राने कळवा.

४. लागलेली आग रोखण्याचे उपाय व साधने यांची माहिती घ्या.

५. वाचा –

आपले प्राण पुन्हा संकटात घालून बापू गायधनी यांनी गाय व वासरांचे प्राण वाचवले, तसे आपण आपले प्राण संकटात न घालताही प्राण्यांचे रक्षण करू शकतो.

पशुपक्ष्यांचे करू संवर्धन। फुलेल सर्वत्र नंदनवन ॥

**व्याकरण :**

**उजळणी : व्यंजन-संधी**

**खालील संधी कसे झालेले आहेत, ते बघा.**

**वाक् + इंद्रिय = क् + इ = ग् + इ = वागिन्द्रिय (क् ऐवजी ग्)**

**षट् + विकार = ट् + व् = ड् + व् = षड्‌विकार (ट् ऐवजी ड्)**

**चित् + आनंद = त् + आ = द + आ = चिदानंद (त् ऐवजी द्)**

**अप् + ज = प् + ज = ब् + ज = अब्ज (प् ऐवजी ब्)**





# ३. फुलपाखरे

**वि. पां. दांडेकर**

मराठीतील प्रसिद्ध लघुनिबंधकार. 'फेरफटका', 'टेकडीवरून', 'काळ बोलतो आहे' हे लघुनिबंधसंग्रह; 'चारित्र्यसुधा', 'तिशीचा तरुण' या कादंबऱ्या आणि 'मराठी नाट्यसृष्टी: सामाजिक नाटके', 'मराठी साहित्याची रूपरेखा' ही प्रबंध पुस्तके प्रसिद्ध आहेत.

'फुलपाखरे' या लघुनिबंधात 'माणसाने जीवनाकडे आनंदमय, आशादायक दृष्टीने पाहिले पाहिजे' हा विचार लेखकाने आपल्या सुखद अनुभवातून मांडला आहे.

---

मी प्रवासात होतो. प्रकृती बरी नव्हती. आगगाडीने निघालो होतो.

दिवस पावसाळ्याचे होते. सृष्टीचे स्वरूप सुजल, सुफल, सस्यश्यामल असे दिसत होते. नदी-नाल्यांतून आणि भातशेतांतून पाणी तुडुंब भरून वाहत होते. थोडी वर आलेली पिके वाऱ्यावर डुलत होती. सृष्टी जणू आनंदाने नाचत असल्यासारखी दिसत होती; परंतु माझ्याच मनावर मळभ आल्याने मी तिच्याशी समरस होऊ शकत नव्हतो. शरीराच्या अस्वास्थ्यामुळे मनाला एक प्रकारची मरगळ आली होती. यामुळे मला सर्व गोष्टी त्या वेळेपुरत्या तरी निरर्थक, क्षणिक वाटत होत्या. नाचरे ओढे आणि हरित तृणाचे गालिचे, माझ्या मनाला नाचवू शकत नव्हते. एखादया पोरक्या पोराप्रमाणे मन स्वतःशीच नाराज होऊन बसले होते. निसर्गातील सुंदर दृश्यांचा त्याच्यावर काहीच परिणाम होत नव्हता.

असे सुमारे तासभर चालले, एका मोठ्या स्टेशनवर गाडी थांबली. चांगली पंधरा मिनिटे थांबली. माझा डबा जवळ जवळ शेवटचा असल्याने त्यात उतारूंची ये-जा झाली नाही. त्यामुळे स्टेशनावरील एका सुंदर दृश्याकडे माझे मन वेधले गेले. स्टेशनच्या आवारात एक सुंदर बाग होती आणि तिच्यात विविध रंगांची झेनियाची फुले उमलली होती. लाल, पिवळी, केशरी, किरमिजी, पांढरी, जांभळी अशी फुले जागच्या जागी वाऱ्याने डुलत होती. राठ दांड्याच्या व रुक्ष पानांच्या झेनियाला इतकी सुंदर फुले कशी येतात याचे मला नेहमी आश्चर्य वाटते. पारिजातकाचेही तसेच नाही का?



पारिजातकाचा बुंधा, पाने, डिक्शा ही सर्व एकंदरीत खडबडीत, खरखरीत, रुक्षच; पण पारिजातकाचे फूल ? नाजूकपणा, सौंदर्य नि सुगंध यांचा नमुनाच पाहून घ्यावा. तसेच झेनियाचे मानता येईल. तसल्या त्या सुंदर, बहुरंगी व बहुढंगी फुलांवर तितकीच सुंदर, बहुरंगी व बहुढंगी फुलपाखरे उडत होती. मकरंदास्वाद घेत होती. त्या नाचणाऱ्या फुलपाखरांकडे पाहिल्यावर फुलपाखरे कोणती अन् फुले कोणती असा भ्रम मला तरी क्षणभर झाला. उडताहेत ती फुले, की डोलताहेत ती फुले, अशी शंका वाटण्याइतके रंगांचे सादृश्य झेनियाच्या फुलांत नि त्या फुलपाखरांत होते. जीवन जर कोठे फुलत असेल, डुलत असेल, नाचत असेल, गात असेल तर ते इथे, असे त्या दृश्याकडे पाहून मला वाटले. जीवनाची, चैतन्याची, आनंदाची कारंजीच येथे थुई-थुई उडत होती. तसेच ते अप्रतिम जीवननृत्य पाहून माझ्या मनावरील मळभ नाहीसे झाले, ते आनंदले. तेवढ्यात गाडी सुरू झाल्याने त्या सुंदर दृश्याचा मला नाइलाजाने निरोप घ्यावा लागला; परंतु माझे विचारचक्र गाडीच्या चक्रांबरोबरच सुरू झाले.

त्या फुलांनी आणि फुलपाखरांनी माझ्या मनाला उत्साह आणि स्फूर्ती दिली. फुलांचे नि फुलपाखरांचे आयुष्य ते किती ? आणि त्या मानाने त्यांनी त्या आयुष्याकरता

दाखवलेली आस्था किती ? फुलांचे आयुष्य, अगदी झेनियाचे फूल झाले तरी, काही दिवसांचे. फुलपाखरांचेही तसेच. मनुष्याचे आयुष्य या दृष्टीने पाहिले असता सहस्र पटींनी मोठे मानावे लागेल. एवढे मोठे आयुष्य लाभलेल्या मनुष्याने कितीतरी समाधानी व आनंदी असावयास हवे. अडचणींनी आणि रोगांनी भांबावून जाण्याचे त्याला काय कारण आहे ? अडचणी, रोग, संकटे ही काही कायमची नसतात ना ? मग त्यांच्याकडे सोशिकपणाने, खिलाडू वृत्तीने आपणांस का पाहता येऊ नये ?

अडचणी, संकटे, रोग यांचे जेव्हा आपणांवर आक्रमण होते, तेव्हा ती फार मोठी किंवा असह्य वाटतात; परंतु ती ओसरल्यावर, आपण त्यांना का घाबरलो तेच आपणांस समजत नाही. आपण घाबरतो याचे कारण आपल्याजवळ मनाची स्थिरता किंवा शांती नसते. मनाची शांती नसते याचे कारण अडचणींचे खरेखुरे स्वरूप आपणांस कळलेले नसते. जीवन म्हणजे संकटे नव्हेत, रोग नव्हेत, अडचणी नव्हेत, कारण ती असतानाही जीवन चालूच असते. मळभ आल्याने सूर्य जसा नाहीसा होत नाही, त्याचप्रमाणे रोगांनी नि संकटांनी जीवनाचे मूळ आनंदी स्वरूप नाहीसे होत नाही. आजारी व संकटग्रस्त माणसेही जेव्हा थट्टा-विनोद करतात, तेव्हा ती या आनंदमय जीवनाचा अनुभव घेत असतात. मला वाटते आपण फार विचार करून किंवा अविचार करून आपले मूळचे आनंदी स्वरूप, आनंदी जीवन विसरून बसलो आहोत. फुलपाखरांना आनंदाने जगता येते, तर आपणांस का येऊ नये ? त्यांना जीवनातील रसास्वाद घेता येतो, तर तो आपणांस का घेता येऊ नये ? आंबट तोंड आणि लांबट चेहरा करून जीवनाचा गाडा आपण ओढत आहोत, असे आपण का वागावे ? मला वाटते मनुष्याखेरीज जीवनासंबंधी फाजील विचार दुसरे कोणीही करत नसेल. मनुष्याने आपल्या बुद्‌धीचा उपयोग करून हेच जीवन अधिक सुखदायक, आनंददायक, रसदायक बनवले पाहिजे. बुद्‌धीने मनुष्याचे जीवन बहारीचे बनले पाहिजे. ते बुजरे किंवा भांबावलेले बनता कामा नये.

**प्रश्न :**

अ. खालील प्रश्नांची प्रत्येकी सात ते आठ वाक्यांत उत्तरे लिहा.

१. आजूबाजूची सृष्टी आनंदात असतानाही लेखक तिच्याशी का समरस होऊ शकत नाही ?

२. कोणत्या दृश्याकडे लक्ष गेल्यावर लेखकाचे मन आनंदित झाले ?

३. त्यामुळे लेखकाच्या मनात कोणते विचार येऊन गेले ?

४. आपण आपले आनंदी जीवन विसरून बसलो आहोत, असे लेखक कशावरून म्हणतो ?
५. बुद्धीचा उपयोग करून माणसाने काय साधावे असे लेखकाला वाटते ?

आ. खालील प्रश्नांची प्रत्येकी एक ते दोन वाक्यांत उत्तरे लिहा.

१. लेखकाला सर्व गोष्टी निरर्थक, क्षणिक का वाटल्या ?
२. झेनिया आणि पारिजातक यांचे ठळक वैशिष्ट्य कोणते ?
३. नाचणाऱ्या फुलपाखरांकडे पाहून लेखकाला काय वाटले ?
४. अडचणी, संकटे, रोग यांना माणसे का घाबरतात ?
५. माणसे आनंदमय जीवनाचा आस्वाद घेत आहेत असे केव्हा वाटते ?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. 'माझ्या आठवणीतील काही आनंदाचे क्षण' या विषयावर पंधरा ते वीस वाक्यांचा निबंध लिहा.
२. सहलीच्या वेळी तुम्ही पाहिलेल्या सुंदर दृश्याचे वर्णन एका परिच्छेदात लिहा.
३. सुजल, सुफल, सस्यश्यामल हे शब्द 'वंदेमातरम' या आपल्या राष्ट्रगीतात आलेले आहेत. ते समजून घेऊन राष्ट्रगीताचा अर्थ नीट समजून घ्या.
४. या लघुनिबंधात आलेल्या निसर्गवर्णनाच्या आधारे चित्र काढून ते रंगवा.
५. अस्वास्थ्य, सादृश्य, चैतन्य, मालिन्य, स्फूर्ती या शब्दांचे अर्थ समजून घेऊन त्यांचा स्वत:च्या वाक्यांत उपयोग करा.
६. आंबट तोंड आणि लांबट चेहरा करणे, जीवनाचा गाडा ओढणे या वाक्प्रचारांचा अर्थ समजून घेऊन त्यांचा स्वत:च्या वाक्यांत उपयोग करा.

**व्याकरण :**

### पूर्वरूप संधी

खालील शब्दांचे संधी कसे झालेले आहेत, ते बघा.

नाही + असा = (ई + अ = ई = 'अ' चा लोप) = **नाहीसा**

झाडी + आत = (ई + आ = ई = 'आ' चा लोप) = **झाडीत**

थोडे + असे = (ए + अ = ए = 'अ' चा लोप) = **थोडेसे**

हे सारे स्वर-संधी आहेत. आधीच्या शब्दातील शेवटचा स्वर संधी होताना कायम राहिला असून, पुढील शब्दातील पहिला स्वर लुप्त झालेला आहे. अशा संधीमध्ये आधीचा स्वर कायम राहतो, म्हणून त्यांना 'पूर्वरूप संधी' म्हणतात. (पूर्व म्हणजे आधीचा.)



# ४. गोकुळची साक्ष

**रा. ग. गडकरी (राम गणेश गडकरी - १८८५ - १९१९)**

कवी, नाटककार आणि विनोदी लेखक. 'गोविंदाग्रज' या नावाने कविता लेखन. 'बाळकराम' या नावाने विनोदी लेखन. 'संपूर्ण बाळकराम' हा त्यांचा विनोदी लेखसंग्रह; 'वाग्वैजयंती' हा कवितासंग्रह; 'राजसंन्यास', 'प्रेमसंन्यास', 'भावबंधन', 'एकच प्याला' 'पुण्यप्रभाव' ही गाजलेली नाटके.

'प्रेमसंन्यास' या नाटकातून हा उतारा घेतलेला आहे. या नाट्यउताऱ्यात गोकुळच्या भाबडेपणामुळे व विसरभोळेपणामुळे निर्माण झालेल्या विनोदाचे दर्शन गडकऱ्यांनी घडवले आहे.

---

(हातात कागद घेऊन गोकुळ प्रवेश करतो.)

**गोकुळ** : (कागदाकडे पाहात काही वाक्ये पुटपुटून) छे बुवा ! या जयंताच्या खटल्याने जीव जेरीस आणला अगदी ! आज इतके दिवस ही साक्ष सारखा पाठ करत आहे; पण चार प्रश्नोत्तरांपलीकडे मजल जात नाही आणि या वकिलांचा म्हणजे साक्षीदारांवर मोठा कटाक्ष ! भारतीय युद्धातल्या सेनापतींची आणि या वकिलांची लढण्याची एक रीत आहे अगदी ! म्हणजे मुख्य मालक धर्म-दुर्योधनाप्रमाणे राहायचे बाजूला आणि खटल्यातल्या या सेनापतीचा साक्षीदारांच्या फौजेवर सारखा हल्ला ! फेरतपासणीच्या चक्रव्यूहात एखादा प्रतिपक्षाचा साक्षीदार वीर सापडला, की मारे त्याच्यावर दरखास्त, सुनावणी, कैफियत, हुकूमनामा या वाग्बाणांचा मारा सुरू व्हायचा ! काय हे शब्द ! दरखास्त, फैसला ! तरीपण ही साक्ष उद्याला पाठ झालीच पाहिजे ! काय करावे ? नुसते सवाल-जबाब आपल्याशी म्हणून उपयोग नाही. प्रश्न कोणी तरी विचारायला पाहिजे होते, म्हणजे उत्तरे द्यावयास ठीक पडले असते. पण कोण

मिळणार असे ? ती जर या वेळी असती तर किती उपयोगी पडली असती ? (तेवढ्यात मथुरा येते.)

गोकुळ : बरी वेळेवर आलीस. माझी उद्या साक्ष आहे ! तेवढी पाठ म्हणून घे पाहू. मी आताच तुझी आठवण केली ! आता तू कोर्ट हो. बैस या खुर्चीवर. हं, लाजू नकोस ! ही सारी रंगाची तालीम झालीच पाहिजे ! घे हा कागद ! चल, बैस लौकर.

मथुरा : इश्श, हे काय भलतेच ?

गोकुळ : बैस लौकर. हं, बसते आहेस का पाठवू माहेरी पुन्हा कोर्टाला ?

मथुरा : हं, ही घ्या बसले !

गोकुळ : अस्से, या कागदातला एकेक प्रश्न विचार आता !

मथुरा : (कागद वाचून) ईश्वरसाक्ष खरे सांगेन, खोटे सांगणार नाही.

गोकुळ : ईश्वरसाक्ष खरे सांगेन, खोटे सांगणार नाही. अं ? हा काही प्रश्न नाही ! हं, पुढे.



मथुरा : तुमचे नाव काय ?
गोकुळ : गोकुळ
मथुरा : बापाचे नाव ?
गोकुळ : वृंदावन.
मथुरा : आडनाव ?
गोकुळ : विसरभोळे.
मथुरा : तुमचे वय काय ?
गोकुळ : वय काय बरे ठरविले आहे ? छे, नाही येत लक्षात ! एक अक्षर सांग पाहू !
मथुरा : पं —
गोकुळ : पंधरा !
मथुरा : भलतेच काहीतरी ! खरे तरी वाटेल कोणाला ?
गोकुळ : अरे हो, पंचवीस ! (घोकतो) छे ! हे वय दगा देणार ! आकडा लक्षात ठेवणे मोठे कठीण ! आण पाहू तो कागद. (कागद घेऊन घोकतो.)
मथुरा : काहीतरी खूण बसवून ठेवावी त्या आकड्याची.
गोकुळ : हो, हो, हा प्रश्न आहे पाचवा, तेव्हा पाचा पाचा पंचवीस ! प्रश्नसंख्येचा वर्ग केला, की झाले काम ! पंचवीस !
मथुरा : आणि वकिलाने चवथ्यांदाच हा प्रश्न विचारला तर ?
गोकुळ : अरेच्च्या ! खरेच ! फट्दिशी चार चोक सोळा ही नऊ वर्षांची खोट बसायची ! काय करावे बरे ?
मथुरा : खरेच मोठी पंचाईत आहे ही. (हसते)
गोकुळ : हां, पंच असतात पाच ! तेव्हा पाच पंचांत हातापायांची बोटे मिळवली की झाले पंचवीस.
मथुरा : पण भीतीने घाबरून हातपाय गळाले तर बोटे कोठली आणणार ?
गोकुळ : आणि डोळ्यांपुढे अंधारी आली तर पंच तरी कोठून दिसणार ? इकडूनही अडचण आहे ! (कागदाकडे पाहून) हां हां, आठवली अगदी सोपी युक्ती !
मथुरा : कोणती ती ?

गोकुळ : गोकुळ वृंदावन विसरभोळे ! माझ्या नावात अक्षरे आहेत बारा ! तेव्हा स्वत:च्या नावातल्या अक्षरांना दोन्ही बाजूंच्या दोन वकिलांनी गुणून त्यात एक न्यायाधीश मिळवला, की झाले बारा दुणे चोवीस आणि एक पंचवीस !

मथुरा : पण न्यायाधीशांकडे पाहावयाचा होईल का धीर ?

गोकुळ : अं ! न्यायाधीश नाहीतर आरोपी मिळवला ! नगास नग असला म्हणजे झाले ! बरे, पुढे सहावा प्रश्न. (कागद तिला देतो.)

मथुरा : तुमचा धंदा काय ?

गोकुळ : अरे धंदा कोणता सांगावा ? हं ! धंदा – वाटेल ती गोष्ट विसरण्याचा !

मथुरा : आणि जेवणखाण्याची सोय ?

गोकुळ : तेही विसरलो ! पण नाही, हा प्रश्न तुझा आहे ! मी फिरून उत्तर देतो, की मी उत्तर देण्याचे नाकारतो ! या प्रश्नाला माझी हरकत आहे ! अशी सावधगिरी ठेवावी लागते, बघितलेस ?

मथुरा : बरे, ही इतकी सावधगिरी ठेवण्यासारखी ती साक्ष तरी महत्त्वाची आहे का ?

गोकुळ : महत्त्वाची ? अगं, माझ्या साक्षीवर तर सारी भिस्त आहे आमची ! नाहीतर जयंताला चार वेळा फाशी जाण्याइतका पुरावा आहे ! पण माझ्या शब्दासाठी त्याची सुटका होणार आहे ! या खटल्याचा चालक, याचा सूत्रधार तर मीच आहे ! उगीच नाही साक्षीसाठी जिवाचा आटापिटा चालवला इतका ! घरात ही कायद्याच्या पुस्तकांची रास पाहिलीस ? वकिलावर ताण झाली आहे माझी !

मथुरा : एका खटल्यातल्या साक्षीने वकिलापर्यंत मजल गेली, मग चार खटल्यांच्या भानगडीने आपण न्यायाधीशच व्हाल ! आता आपल्या बाजूला काही वकिलाची जरूर राहिली नसेल.

गोकुळ : अरेरे, अगदी विसरलो ! आमच्या तर्फेचा विद्याधर वकील कालपासून कोठे गडप झाला आहे, पत्ता नाही. आजपर्यंत खटल्यातले आरोपी फरारी होत असत; पण वकीलच परागंदा झाल्याचा हा पहिला खटला आहे ! त्यामुळे तात्यासाहेब मोठ्या

फिकिरीत पडले आहेत आणि सारखे वकिलाच्या शोधात आहेत. मी दोन-चार वकिलांकडे नन्नाचा पाढा ऐकून आलो, ते तात्यासाहेबांना सांगायचे राहिले आहे ! वकील कोणी नाही.

मथुरा : मग आपले वसंतराव नाही का चालायचे ? ते वकीलच आहेत ना !

गोकुळ : पण त्यांचा पत्ता आहे कोठे ? ते वीणाताईबरोबर केव्हाच फरारी झाले आहेत.

मथुरा : एवढेच ना ! त्यांचा पत्ता मी सांगते. ती दोघेही आमच्या बाबांच्या शांतिसदनात आहेत.

गोकुळ : काय म्हणतेस ? मग आताच्या आता हे तात्यासाहेबांना कळवले पाहिजे. म्हणजे तारेने बोलावल्याबरोबर उद्याच वसंतराव येथे येतील ! जा, तू घरातले पाह्य आता ! मी जाऊन येतो. (ती जाते.) वसंतरावांचा पत्ता सांगितला हे फार नामी झाले ! आणि मथुरा ताळ्यावर आली हेही फार नामी झाले ! आता आपला मूळचा विसराळू स्वभाव विसरला पाहिजे आणि तेवढेच जरा कठीण आहे. एखादी गोष्ट विसरण्याची अडचण मला जन्मात प्रथम भासते काय ती याच वेळी ! अगं ए मथुरे, आलीस का ? दरखास्त ! कैफियत ! (मथुरा येते.) या खुर्च्या, ने पाहू ओढून आत ! चलाव मुकदमा, हुकूमनामा ! काय जोर आहे या शब्दांत ! (मथुरा खुर्ची नेते.) आपण तर पुढे-मागे पोरांची नावेसुद्धा हीच ठेवणार ! दरखास्त, कैफियत, जप्ती ही मुलींची नावे, आणि मुकदमा, हुकूमनामा, फैसला ही मर्दानी नावे मुलांना ! आणि स्वत: मुखत्यार वकील होणार ! बस्स, ठरला हा कायम बेत.

(जातो. पडदा पडतो.)

(आणि कोर्टात)

(कचेरीचा देखावा. सर्व मंडळी. साक्षीदाराच्या पिंजऱ्यात गोकुळ.)

शिरस्तेदार : ईश्वरसाक्ष खरे बोलेन, खोटे बोलणार नाही.



गोकुळ : ईश्वरसाक्ष खरे बोलेन, खोटे बोलणार नाही.

शिरस्तेदार : तुमचे नाव काय ?

गोकुळ : गोकुळ.

शिरस्तेदार : बापाचे नाव काय ?

गोकुळ : वृंदावन.

शिरस्तेदार : आडनाव ?

गोकुळ : विसरभोळे.

वकील : बरे, आता सांगा पाहू तुमचे वय काय ?

गोकुळ : (स्वगत) हं, तोच प्रश्न ! आता काय करायचे ? नावातल्या अक्षरांना दोन्ही वकिलांनी गुणून त्यात न्यायाधीश मिळवायचा ? हो असेच ! नाही, पण मला वाटते, अक्षरांना न्यायाधीशाने गुणून दोन वकील मिळवायचे असे असावे ! हं, हेच बरोबर आहे ! बारा एके बारा न् दोन चौदा. (प्रकट) चौदा वर्षे !

वकील : चौदा वर्षे ? तुम्ही शुद्धीवर आहात का ?

गोकुळ : (स्वगत) चुकलो, वकिलांनीच गुणायचे ! बारा दुणे चोवीस न् एक पंचवीस. (प्रकट) पंचवीस.

वकील : पहिल्याने चौदा कशी सांगितली ?

गोकुळ : पहिल्याने फुकट गेलेली वर्षे जमेस धरली नव्हती.

वकील : वा ! या हिशेबाने पहिल्याने शून्यच उत्तर दयायला हवे होते. तुम्ही घाबरला काय ?

गोकुळ : मी घाबरलो ? तो काय म्हणून ? मी काही माझ्या बायकोचा खून केला नाही !

वकील : तुम्ही आरोपीला ओळखता का ?

गोकुळ : तुम्ही आपल्या बंधूंना ओळखता का ? न्यायाधीशसाहेब या शिरस्तेदारांना ओळखतात का ?

वकील : माझ्या प्रश्नाचे नीट उत्तर दया. तुम्ही आरोपीला ओळखता का ?

गोकुळ : हो, त्यांना ओळखतो आणि आपल्याला पण चांगला ओळखून आहे बरे मी !

वकील : जयंताला सोडवण्यासाठी तुम्ही एखादी खोटी शपथ घ्याल का ?

गोकुळ : अलबत, का नाही ? एक सोडून हजार घेईन ! प्रत्यक्ष श्रीकृष्णांनी सुद्धा सांगितले —

वकील : ते राहू दया ! हे पत्र माहीत आहे का तुम्हांला ?

गोकुळ : हो ! माहीत आहे ! लीलाताईंनी जयंतांना पाठवलेले पत्र हे !

वकील : किती वेळा पाहिले आहे तुम्ही ?

गोकुळ : एक वेळा !

वकील : जयंताचे बायकोशी पटत नाही हे खरे की नाही ?

गोकुळ : हे खरे आहे ! जयंत बायकोचा अत्यंत तिरस्कार करीत असत.

वकील : तुमची बायको तुम्हांला वागवून घेता येत नाही हे खरे आहे ना ?

गोकुळ : त्याच्याशी तुम्हांला काय करायचे आहे ?

न्यायाधीश : गप्प बसा, ते विचारतात त्याचे उत्तर दया.

गोकुळ : न्यायमूर्तींना माझी एक विनंती आहे. माझ्या मते, आमची घरगुती भांडणे न्यायासनासमोर आणण्याचे काही कारण नाही. असल्या

प्रश्नांची उत्तरे आम्ही देणार नाही ! नाहीतर आम्ही मुळी साक्षच द्यायला तयार नाही !

न्यायाधीश : असे कसे चालेल ? साक्ष दिलीच पाहिजे ! न्यायाला मदत ही प्रत्येकाने केलीच पाहिजे !

गोकुळ : हा चांगला न्याय आहे ! यांनी आमच्या बायकोच्या वाटेल तशा चौकशा कराव्या आणि आपण आम्हांला गप्प बसा म्हणून म्हणता ! मी जरा तोंडाचा फटकळ आहे — आपण आणि हे वकील लोक नेहमी एक ठिकाणी कामे करता तेव्हा आपला त्यांच्याकडे थोडासा ओढा असणे स्वाभाविक आहे. त्याला कोण गैर म्हणेल ? (लोक हसतात.) हं साहेब, हशावारी बाब घालवू नका ! आपण न्यायाधीश आहात, असा पक्षपात आपल्याला शोभत नाही ! आपल्याला वकील आणि साक्षीदार सारखेच ! मीही थोडाबहुत कायदा जाणतो ! चार पुस्तके पाहिली —

न्यायाधीश : (हसून) काय वेडगळ मनुष्य ! (वकिलास) चालू द्या तुमचे सवाल !

वकील : तुमचा स्वभाव थोडासा विसराळू आहे की नाही ?

गोकुळ : असेल, तुम्हांला काय त्याचे ? तुम्ही आपले प्रश्न विचारा, उत्तर मिळाले नाही, तर मग बोला ! आमच्या वकिलांनी पढवलेले सारे जबाब सवालावाचून पाठ म्हणून घ्या हवे तर.

वसंत : अरे गोकुळ, मी कधी तुला पढवून ठेवला आहे ?

गोकुळ : असे का बरे वसंतराव ? मी नाही प्रतिज्ञेवर खोटं बोलायचा.

वसंत : (स्वगत) चांगली सोय ! आणि हा आमच्यातर्फेचा साक्षीदार !

वकील : काय हो, हे पत्र तुम्ही किती वेळा पाहिले आहे ?

गोकुळ : काय हो, हा प्रश्न तुम्ही किती वेळा विचारणार ?

वकील : तुम्ही उत्तर द्या आधी.

गोकुळ : दोन वेळा.

वकील : मघाशी एक वेळ पाहिले म्हणाला, आता दोन वेळा पाहिले म्हणता, हे काय ?

गोकुळ : मघाशी विचारले त्यापूर्वी एक वेळा पाहिले होते, आताच्या विचारण्याला मघाशी पाहिले ती वेळ हिशेबी धरली पाहिजे ! पूर्वीची एक व मघाची एक मिळून दोन !

वकील : वसंतराव, झालेल्या प्रश्नोत्तरांवरून तुमच्या साक्षीदाराची नालायकी दिसून येत आहे. या मनुष्याला व्यवहारज्ञान नाही, हा विसरभोळा आहे, त्याची आणखी फेरतपासणी केली तर तुमचे नुकसान होणार ! तेव्हा तुमची इच्छा असल्यास याची साक्ष काढून घेण्याची मी संधी देतो.

वसंत : या संधीबद्दल मी आपला आभारी आहे ! न्यायमूर्तींनी असे करण्याचा हुकूम द्यावा.

न्यायाधीश : गोकुळ, तुझ्या नालायकीमुळे तुझी साक्ष काढून टाकण्यात येत आहे. तुला बाहेर येण्याची परवानगी आहे.

गोकुळ : इतके करूनही मी नालायक ! शहाण्याने कोर्टाची पायरी चढू नये म्हणून वाडवडील म्हणत आले ते काही खोटे नाही ! (पिंजऱ्यातून बाहेर येतो.)

**प्रश्न :**

खालील प्रश्नांची उत्तरे प्रत्येकी तीन ते चार वाक्यांत लिहा.

१. गोकुळचा जीव जेरीस का आला ?
२. साक्षीची रंगीत तालीम गोकुळने कोणत्या प्रकारे घेतली ?
३. वयाची आठवण ठेवण्यासाठी गोकुळने कोणती युक्ती शोधून काढली ?
४. 'विसरभोळे' हे आडनाव योग्य का वाटते ?
५. आम्ही साक्ष द्यायला तयार नाही असे गोकुळ का म्हणाला ?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. संदर्भासहित स्पष्टीकरण लिहा.
   अ. 'पण वकीलच परागंदा झाल्याचा हा पहिला खटला आहे !'
   ब. 'माझ्या साक्षीवर तर सारी भिस्त आहे आमची !'
   क. 'बस्स, ठरला हा कायम बेत.'
२. पाठातील कोणती वाक्ये वाचताना तुम्हांला हसू येते ? का ? थोडक्यात लिहा.

३. द. मा. मिरासदार यांची 'साक्षीदार' ही कथा मिळवून वाचा.

४. नियतकालिकांत येणारे विनोद वाचा व त्यांचा संग्रह करा.

५. कोर्टाशी संबंधित असलेल्या शब्दांची ओळख करून घ्या व एक यादी करा.

**व्याकरण :**

**पररूप संधी**

आता खालील संधी कसे झालेले आहेत ते पाहा.

ठेव + ऊन = (अ + ऊ = ऊ = 'अ' चा लोप) = **ठेवून**

मार + ईत = (अ + ई = ई = 'अ' चा लोप) = **मारीत**

हर + एक = (अ + ए = ए = 'अ' चा लोप) = **हरेक**

**या स्वरसंधीमध्ये आधीच्या शब्दातील शेवटच्या स्वराचा लोप झालेला असून पुढील शब्दाच्या आधीचा स्वर कायम राहिला आहे. पुढील स्वर या संधीत कायम राहतो म्हणून या संधींना 'पररूप संधी' म्हणतात. (पर=पुढील)**





# ५. उद्योगमहर्षी वालचंद हिराचंद

**गोविंद तळवलकर (गोविंद श्रीपाद तळवलकर - जन्म : १९२५)**

वृत्तपत्रीय लेखन व संपादन कार्यात विशेष नावलौकिक प्राप्त. 'अग्रलेख', 'नवरोजी ते नेहरू', 'परिक्रमा', 'वाचता वाचता' ही त्यांची पुस्तके प्रसिद्ध आहेत.

हा पाठ 'अक्षय' या पुस्तकातून घेतला आहे.

उद्योगमहर्षी वालचंद यांच्या कार्यकर्तृत्वाची ओळख या पाठातून करून दिली आहे.

---

वालचंद हिराचंद यांना उद्योगमहर्षी म्हणत. त्यांना दिलेली ही पदवी किती सार्थ होती हे त्यांचे कार्य व कर्तृत्व पाहिल्यावर लक्षात येते. गेल्या शतकाच्या अखेरच्या काही दशकांत महाराष्ट्राचे जीवन सर्वांगाने फुलत, बहरत होते. रानडे, टिळक, गोखले यांसारखे नेते; किर्लोस्कर, देवल यांच्यासारखे नाटककार; गणपतराव जोशी, भाऊराव कोल्हटकर, बालगंधर्व, बोडस यांच्यासारखे नट; बाळकृष्णबुवा इचलकरंजीकर, अल्लादिया खाँ यांसारखे गवई; हरी नारायण आपटे यांच्यासारखे कादंबरीकार; यांच्याच जोडीला उद्योगाच्या क्षेत्रातही काही दूरदर्शी माणसे खंबीर पावले टाकत होती. औंधच्या पंतप्रतिनिधींनी जागा वगैरे देऊन लक्ष्मणराव किर्लोस्करांना उद्योग सुरू करण्यास वाव दिला. मग किर्लोस्करांच्या औद्योगिक प्रकल्पांचा शाखाविस्तार मोठ्या प्रमाणावर झाला. लाकडी नांगराचा लोखंडी नांगर करणे हा क्रांतिकारक बदल होता. त्याचा प्रारंभ किर्लोस्करांनी केला.

वालचंद हिराचंद यांनी दुसऱ्या क्षेत्रात पदार्पण केले आणि कर्तृत्वाची अनेक शिखरे त्यांनी यशस्वीपणे गाठली. त्या काळात राजकारणी व्यक्ती, या देशात औद्योगिक प्रगती व्हावी म्हणून मागणी करत होत्या. न्यायमूर्ती रानडे यांनी कच्चा माल पैदा करण्यात सार्थक न मानता, पक्का माल तयार करण्याचे महत्त्व वारंवार प्रतिपादन केले होते. दादाभाई नौरोजी यांनी भारतातून संपत्तीचा ओघ इंग्लंडकडे वाहतो हा विचार मांडताना येथे उद्योगधंदे वाढले पाहिजेत; असाच आग्रह धरला होता. आपल्या राष्ट्रीय चळवळीचीही हीच मुख्य मागणी होती. त्यामुळे कारखाना काढणे म्हणजे



समाजाला पिळण्याचे एक साधन हाती बाळगणे अशी कल्पना त्या वेळी करून घेतली जात नव्हती. उलट कारखान्यांचे स्वागत होत होते आणि कारखानदार हे देशसेवाच करतात असे मानले जात होते, म्हणून पुण्यात जेव्हा पहिली कापड गिरणी निघाली, तेव्हा 'पुण्यातील पहिली चिमणी' असा अग्रलेख लिहून लोकमान्यांनी तिचे स्वागत केले.

वालचंद हिराचंद या वातावरणात वाढत होते. महाविद्यालयात असताना रानडे यांच्या आर्थिक विचारांचा त्यांच्या मनावर परिणाम झाला होता. दादाभाईंनी स्वदेशी कारखानदारीचे महत्त्व प्रतिपादन केले, तेव्हा याच क्षेत्रात कर्तृत्व गाजवण्याचा वालचंद यांनी निश्चय केला.

वालचंद यांच्या जीवनाचा विचार केला तर असे दिसते, की व्यवसायाला प्रारंभ करताना त्यांना मोठ्या मालमत्तेचा आधार नव्हता. वडिलार्जित सावकारीचा व्यवसाय केला असता, तर इतर व्यापाऱ्यांप्रमाणे ते यशस्वी व्यापारी ठरले असते; पण वालचंद यांनी तसे केले नाही. त्यांनी प्रथम रेल्वेचे ठेकेदारीचे कंत्राट मिळवले. या कामी त्यांना लक्ष्मण बळवंत फाटक यांचे साहाय्य झाले. पुढे फाटक थकले; पण वालचंद स्वतःच्या बळावर एकेक काम हाती घेत गेले. मुंबईतील हार्बर ब्रँच रेल्वेचे बांधकाम

हे त्यांचे पहिले मोठे काम. पूल बांधून त्यावरून गाड्यांचे रूळ घालण्याचे हे जोखमीचे काम वालचंद यांनी यशस्वी करून दाखवले. युद्धकाळात बेळगाव, देवळाली, पुणे येथे बराकी बांधण्याची कामे त्यांनी केली होती; पण हार्बर ब्रँचच्या कामाने त्यांचा आत्मविश्वास वाढला व इतरांचाही त्यांच्याबद्दलचा विश्वास वाढीला लागला. त्यानंतर बोरघाटातील बोगद्याची कामे त्यांनी अशीच धडाडीने पार पाडली. एका विशिष्ट तऱ्हेच्या कामातच सार्थक मानण्याचा वालचंद यांचा स्वभाव नव्हता. तेव्हा त्यांनी मोठमोठ्या पुलांची कंत्राटे घेतली. म्यानमारमधील (ब्रम्हदेश) इरावती नदीचा पूल बांधणे हे एक अवघड काम होते. ते त्यांनी पुरे केले. क्वेट्ट्यात भूकंप झाल्यानंतर त्याची पुनर्रचना ठरलेल्या अवधीत वालचंद यांनी करून दाखवली. बांधकामाच्या मोठमोठ्या कामांसाठी टाटा कन्स्ट्रक्शन कंपनीचे साहाय्य त्यांनी घेतले होते. तथापि नंतर त्यांनी स्वतःच्या प्रिमियर कन्स्ट्रक्शन व हिंदुस्थान कन्स्ट्रक्शन या कंपन्या नावारूपाला आणल्या.

तथापि या देशाला आवश्यक आणि उपयुक्त अशा मूलभूत उद्योगांचा पाया घालण्याची यशस्वी सुरुवात करणे यातच वालचंद यांचे खरे कर्तृत्व दिसून येते. वालचंद यांच्या कार्याचा आढावा घेतला तर असे दिसेल, की त्यांनी एक उद्योग सुरू केला की त्याच्याशी संबंधित असलेला दुसरा उद्योग सुरू करण्याच्या मागे ते लागत. मोठमोठी बांधकामे करत असतानाच ह्यूम पाइपच्या कारखान्याची योजना त्यांना सुचली आणि त्यांनी ती अमलात आणली. एकदा रेल्वेच्या प्रवासात असताना ग्वाल्हेरच्या महाराजांची बोट विकायची आहे असे त्यांना कळले. वालचंदांनी ती बोट लगेच विकत घेतली; पण एका बोटीवर त्यांचे समाधान होणार नव्हते. सागरी वाहतूक ही ब्रिटिशांची मक्तेदारी होती. तिच्याविरुद्ध टक्कर देण्याचा निर्धार वालचंद यांनी केला. लॉर्ड इंचकेप हे या मक्तेदारीचे प्रमुख. सरकार त्यांच्या पाठीशी. असे असताना सागरी वाहतुकीवरील ब्रिटिशांच्या मक्तेदारीला वालचंद यांनी सर्व शक्तीनिशी टक्कर दिली. समुद्रावरील तुम्ही चाचे आहात अशी टीका इंचकेप यांनी केली, तेव्हा तुम्हीच चाचे आहात असे लंडनला त्यांच्याच कार्यालयात वालचंद यांनी त्यांना ठणकावून सांगितले.

वालचंद यांच्या चरित्रातील हा भाग मोठा रोमहर्षक आहे. धाडसीपणा, संघर्षाची तयारी इत्यादी बाबतींत लोकमान्य टिळक त्यांचे आदर्श होते. लॉर्ड इंचकेप व इतर ब्रिटिश अधिकारी यांच्याशी त्यांचा जो संघर्ष झाला त्यावरून हे स्पष्ट होईल. सिंदिया

स्टीम नेव्हिगेशन कंपनी स्थापन करून जलवाहतूक व्यवसायातही त्यांनी आपले वर्चस्व स्थापित केले; परंतु तेवढ्यावर थांबले तर वालचंद कसले ? त्यांनी जहाज बांधणीचाच कारखाना काढण्याचे ठरवून विशाखापट्टण येथे त्याची स्थापना केली. पुढे स्वतंत्र भारतात सरकारी धोरणाप्रमाणे तो कारखाना सार्वजनिक क्षेत्रात आला. मोटार आणि विमान यांच्या बांधणीच्या क्षेत्रांतही वालचंद यांनी महत्त्वाकांक्षी योजना आखून त्या यशस्वी केल्या. विमान निर्मितीचा कारखाना पुढे सरकारी मालकीचा झाला. मोटार उत्पादनाचा कारखाना मात्र खाजगी क्षेत्रातच राहिला.

कारखानदारीबरोबर शेतीकडेही वालचंद यांनी लक्ष दिले, म्हणून रावळगाव आणि वालचंदनगर या वसाहती उभ्या राहिल्या. साखर कारखाना निघाला. साखर कारखाना काढला तर त्याची यंत्रे दुरुस्त करणारे वर्कशॉप हवे. ते काढून कारखान्याला लागणारी यंत्रसामग्री बनवण्याची जबाबदारी वालचंद शेटजींचे बंधू गुलाबचंद यांनी स्वीकारली. कारखानदारीशिवाय तरणोपाय नाही, कमीत कमी लोक शेतीवर अवलंबून राहतील असा दिवस उजाडण्याची आवश्यकता आहे, हे वालचंद यांच्या मनाने पक्के घेतले होते आणि त्यांनी अनेक संकटांना तोंड देऊन मूलभूत उद्योगांचा पाया घातला. उद्यम हाच देव आणि त्याची सेवा हीच देशसेवा अशी त्यांची भावना होती. त्यांच्याकडे धर्माविषयी कोणी चर्चा करू लागल्यास व धार्मिक कारणाकरता देणग्या मागू लागल्यास ते सांगत, 'आपण दगड, विटा, चुना यांत रमणारे आहोत. कारखान्याचे काही बोलत असला तर बोला.' त्यांना 'सावता माळी' हा चित्रपट फार आवडे. 'कांदा, मुळा भाजी ! अवघी विठाबाई माझी' हे त्यातील वचन ते लोकांना ऐकवत असत व सावता माळी आपला आदर्श आहे असे सांगत.

इतरांच्या ठिकाणी क्वचित आढळणारा एक गुण त्यांच्यापाशी होता, तो म्हणजे चौकसपणा. ते प्रवास भरपूर करत. प्रवासात त्यांची चौकसबुद्धी सदैव जागृत असे. परदेशात कोणत्या क्षेत्रात नवे संशोधन कार्य चालत आहे, कोणती नवी यंत्रसामग्री व कार्यपद्धती वापरात आहे याचा ते तपास घेत आणि ती आत्मसात करण्याचा प्रयत्न करत. परदेशी तंत्रज्ञानावर विसंबून राहण्यापेक्षा आपल्या देशात तंत्रज्ञ तयार करण्यावर त्यांचा भर होता.

कारखानदारीत रमणारे वालचंद वाङ्मय, नाटके व चित्रपट यांतही रस घेत. मराठी नाटकांच्या प्रयोगाला ते हटकून उपस्थित असत. हरिभाऊंच्या कादंबऱ्यांपासून ते मराठीतील नव्या कथा-कादंबऱ्यांपर्यंत ते वाचन करत. ते थोडे गाणेसुद्धा शिकले

होते. व्याप वाढल्याने वाचनास वेळ कमी मिळे तेव्हा विद्वान, रसिक अशांना मुद्दाम बोलावून आणून त्यांच्याशी ते गप्पागोष्टी करत. अशा बहुश्रुततेचे त्यांना विशेष महत्त्व वाटत होते.

आधुनिक औद्योगिक भारताचा पाया घालणारे जे महर्षी येथे झाले,त्यात वालचंद यांचा वाटा फार मोठा आहे.

**प्रश्न :**

अ. खालील प्रश्नांची उत्तरे प्रत्येकी पाच ते सात वाक्यांत लिहा.

१. गेल्या शतकाच्या अखेरच्या काही दशकांत महाराष्ट्राचे जीवन सर्वांगाने फुलत, बहरत होते असे का म्हटले आहे ?

२. औद्योगिक क्षेत्रात कर्तृत्व गाजवण्याचा निश्चय वालचंद यांनी का केला ?

३. वालचंद यांनी कोणकोणती औद्योगिक कामे केली ? देशाला आवश्यक आणि उपयुक्त अशा कोणत्या उद्योगांचा त्यांनी पाया घातला ?

४. वालचंद यांचा चौकसपणा कोणकोणत्या गोष्टींतून दिसून येतो ?

५. वालचंद यांना उद्योगमहर्षी असे का म्हटले जाते ?

आ. खालील प्रश्नांची एक ते दोन वाक्यांत उत्तरे द्या.

१. लक्ष्मणराव किर्लोस्कर यांनी औद्योगिक क्षेत्रात कोणती कामगिरी केली ?

२. 'पुण्यातील पहिली चिमणी' हा अग्रलेख लोकमान्य टिळकांनी का लिहिला ?

३. वालचंद यांनी वडिलार्जित व्यवसाय का केला नाही ?

४. जलवाहतुकीच्या व्यवसायात वालचंद का शिरले ?

५. वालचंद यांना 'सावता माळी' हा चित्रपट का आवडत असे ?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. खालील वाक्याचे थोडक्यात स्पष्टीकरण करा.
'उद्यम हाच देव व त्याची सेवा हीच देशसेवा.'

२. खालील शब्दसमूहांचा अर्थ सांगून त्याचा स्वत:च्या वाक्यांत उपयोग करा.
खंबीर पावले टाकणे, पदार्पण करणे, टक्कर देणे, तोंड देणे.

३. परिसरातील एखादया लघुउदयोजकाची मुलाखत घेऊन मिळालेल्या माहितीच्या आधारे एक छोटासा व्यक्तिपरिचयात्मक लेख लिहा.

व्याकरण :

## विसर्ग संधी

मागील इयत्तेत आपण स्वरसंधी व व्यंजनसंधी कसे होतात हे पाहिले. आता विसर्ग संधी कसा होतो याचा अभ्यास करायचा आहे. जोडशब्दातील पहिल्या शब्दाच्या शेवटी जर विसर्ग असेल तर संधी होताना त्या विसर्गाबद्दल कोणता वर्ण येतो ते पाहू.

(१) पुढील जोडशब्द पाहा :

| क्रम | जोडशब्द | पोटशब्द | होणारा बदल | एकापुढे एक येणारे स्वर व होणारा संधी |
|---|---|---|---|---|
| १. | मनोराज्य | मनः + राज्य | मन + उ + राज्य | अ + उ = ओ |
| २. | तेजोनिधी | तेजः + निधी | तेज + उ + निधी | अ + उ = ओ |
| ३. | यशोगिरी | यशः + गिरी | यश + उ + गिरी | अ + उ = ओ |
| ४. | तपोधन | तपः + धन | तप + उ + धन | अ + उ = ओ |

वरील प्रत्येक शब्दात विसर्गाच्या मागे 'अ' हा वर्ण आला आहे व पुढे मृदू व्यंजन आले आहे. इथे विसर्गाचा 'उ' होऊन तो मागील 'अ' या स्वरात मिळून (अ + उ =) 'ओ' हा वर्ण तयार झाला. यावरून असे लक्षात येईल, की

**विसर्गाच्या मागे 'अ' हा स्वर व पुढे मृदू व्यंजन आले तर विसर्गाचा 'उ' होतो व तो मागील 'अ'मध्ये मिळून त्याचा 'ओ' होतो.**

(२) खालील जोडशब्द पाहा :

| क्रम | जोडशब्द | पोटशब्द | कोणता बदल होतो ? |
|---|---|---|---|
| १. | रजःकण | रजः + कण | विसर्ग कायम राहतो. |
| २. | प्रातःकाल | प्रातः + काल | |
| ३. | अधःपात | अधः + पात | |
| ४. | इतःपर | इतः + पर | |

वरील शब्दांत विसर्गाच्या मागे 'अ' हा स्वर असून पुढे क्, प् ही कठोर व्यंजने आली आहेत. त्यामुळे विसर्गात कोणताच बदल झालेला दिसत नाही.

यावरून असे दिसून येईल, की **विसर्गाच्या मागे 'अ' हा स्वर असून पुढे क्, ख्, प्, फ् ही कठोर व्यंजने आली तर विसर्ग कायम राहतो.**



# ६. जेव्हा घंटा वाजते

प्रमोद नवलकर (जन्म : १९३५)

मराठीतील प्रसिद्ध दै. 'नवशक्ती' चे स्तंभलेखक, विचारवंत. साप्ताहिक मार्मिकचे माजी संपादक. 'मुंबई महानगरी', 'भटक्या', 'प्रभात', 'आठवणी' इ. त्यांची पुस्तके प्रसिद्ध आहेत.

'जेव्हा घंटा वाजते' हा लघुनिबंध 'हळुवार' या पुस्तकातून घेतला आहे. घंटेचे मानवी जीवनातील स्थान व महत्त्व या पाठातून स्पष्ट केले आहे.

---

परवा माझ्या वाढदिवशी एका मित्राने मला एक सुरेख घड्याळ दिले. त्या घड्याळावर दोन घंटा असून तासा-तासाला त्या वाजत असतात. ते घड्याळ मला देण्यामागे मित्राचा काय हेतू होता कोणास ठाऊक. मी जेमतेम ४ तास झोपतो. त्या झोपेतून तासा-तासाला माझी झोपमोड व्हावी असा 'दुष्ट' हेतू त्यामागे असावा; पण ते घड्याळ खरोखरच सुरेख आहे. घड्याळापेक्षा त्यावर बसवलेल्या दोन घंटा नजर वेधून घेतात.

पहिल्या तासाला ती घंटा वाजली आणि थांबली; पण त्या वेळी सुरू झालेली माझ्या डोक्यातील घंटा अद्याप थांबायला तयार नाही. उगाचच मनात विचार आला, की आपण आयुष्यात पहिली घंटा केव्हा ऐकली ? मला वाटत नाही कोणी या प्रश्नाचे उत्तर देऊ शकेल. ते उत्तर शोधता शोधता मला आयुष्यात ऐकलेल्या घंटा आठवल्या, की कोणीतरी चहूबाजूंनी घंटानाद करत आहे असे वाटते. त्या घंटानादाने मला भंडावून सोडले आहे, कारण जगाच्या पाठीवर एवढ्या प्रकारच्या घंटा असतील असे मला आजपर्यंत वाटले नव्हते. ठाकूरद्वारच्या नगरपालिकेच्या शाळेत मी होतो, तेव्हा दोन घंटानादात माझे आयुष्य फिरत होते. त्या दोन्ही घंटा एकच, आवाज एकच; पण अर्थ मात्र दोन होते. सकाळी शाळा भरायची, तेव्हा घंटा माझ्या घरापर्यंत ऐकू यायची. तेव्हा धावत-पळत शाळेत जावे लागायचे. शाळेत गेल्यावर शाळा सुटायच्या वेळी घंटा कधी वाजते याकडे आमचे लक्ष लागलेले असायचे.

डॉक्टर लोक म्हणतात, की माणसाचे आयुष्य त्याच्या हृदयाच्या ठोक्यावर चालू राहते. मला ते पटत नाही. माझे स्पष्ट मत आहे, की माणसाचे संपूर्ण आयुष्य घंटेवर अवलंबून असते; कारण मी शाळेतून कॉलेजात गेलो तेव्हा देखील माझ्या सर्व हालचाली घंटाच ठरवत होती. घंटा झाली, की कॉलेजात जावे लागे. घंटा झाली, की एक विषय संपायचा आणि दुसरा विषय सुरू व्हायचा. पुन्हा घंटा झाली, की सरांना वर्गाबाहेर जावे लागे. शेवटची घंटा झाली, की कॉलेजमधून बाहेर पडण्याची मुभा असे.

संध्याकाळी घरी आल्यावर पोटात भूक असली तरी जेवायला मिळत नसे, कारण तसे माझे वडील फार शिस्तीचे होते. माझ्या घरासमोर झावबा राम मंदिर आहे. तेथे बरोबर रात्री ८ वाजता पहारेकरी घंटा वाजवत होता. त्याने ती घंटा वाजवल्याशिवाय आई आम्हांला जेवायला वाढत नसे, म्हणजे आमचे जेवणसुद्धा त्या घंटेवर अवलंबून होते. जेवल्यानंतरही सुटका नव्हती. रात्री घड्याळात १० टोले पडले, की जबरदस्तीने झोपावे लागे आणि सकाळी ६ चे टोले पडले, की साखरझोपेत पाठीवर धपाटे मिळत होते.

हे सर्व ध्यानात आल्यावर प्रथम माणसाचा जन्म झाला,की घंटा जन्माला आली असा प्रश्न पडतो. घंटा हा विषय माणसाच्या आयुष्याशी एवढा निगडित असतो, की अद्याप त्यावर कोणी महाकाव्य कसे लिहिले नाही याचे मला आश्चर्य वाटते. एका घंटेतून किती अर्थ आणि अनर्थ निघू शकतात. आता ते दिवस गेले; पण लहान होतो तेव्हा मी एका घंटेची वाट पाहात होतो. मला आइसफ्रूट फार आवडायचे. त्या वेळी ते दोन पैशाला मिळायचे. तो आइसफ्रूटवाला वाडीत आला, की घंटा वाजवायचा आणि आम्ही सगळी पोरे दोन पैसे घेऊन खाली धावायचो.

या घंटेपासून विभक्त होण्याचा माणसाने कितीही प्रयत्न केला, तरी त्याला ते कदापि शक्य होणार नाही; कारण घंटेवर अवलंबून राहावे लागते,म्हणून जर देवापुढे जाऊन हात जोडले तरी देव म्हणतो, मला जागे करण्यासाठी भक्तालाही घंटेचाच वापर करावा लागतो. केवळ आपल्या देवानेच नव्हे,तर जगाच्या पाठीवरील सर्वच देवांनी घंटेचा स्वीकार केलेला दिसतो. त्यांपैकी घंटासम्राट म्हणून कोणाला पदवी द्यायची असेल, तर आपल्या देवाचा अपमान न करता चर्चच्या घंटेला द्यावी लागेल. घंटेचा आवाज कितीही कर्कश असला आणि चर्चमधील घंटा कितीही मोठी असली,तरी तिचे टोले पडू लागले, की ते संपूच नयेत असे वाटते. ते नादमाधुर्य कोणालाही वेड लावते.

रोमच्या चर्चच्या गच्चीत जी ३० फूट उंचीची घंटा बसवलेली आहे ती तासा-तासाला एक कृत्रिम माणूस वाजवतो. तिचा घंटानाद ऐकण्यासाठी हजारो लोक चर्चच्या आवारात जमत असतात. मुंबईत घंटा सर्वाधिक पॉप्युलर कोणी केली असेल तर ती फायर ब्रिगेडने. बंब घंटा खणखणत आला, की लोकांना केवढा दिलासा मिळत असे. आता ती घंटा गेली आणि सायरन आला.आता हॉर्न आलेत. पूर्वी घोडागाडीला घंटा होती. त्या वेळी रुग्णवाहिकेलाही घंटा असायची. मंद मंद टोले वाजवत रुग्णवाहिका रस्त्याने धावायची. अपवाद म्हणून आजही स्वस्तिक लीगच्या रुग्णवाहिकेला घंटा ठेवलेली आहे.

केवळ माणसाच्या नव्हे, तर सर्वच हालचाली या घंटेने आपल्या हातात ठेवल्या आहेत. गेल्या महिन्यात भुसावळ रेल्वे स्टेशनवर माझी गाडी ३ तास अडकून पडली. गाडीतील हजारो लोक कानात प्राण आणून गाडीच्या घंटेची प्रतीक्षा करत होते. अखेर घंटा वाजली आणि गाडी सुरू झाली.

एकदा एका मंगल कार्यालयात एक विवाहसमारंभ चालू होता. समारंभ रंगात आला होता. इतक्यात मॅनेजरने घण्घण् घंटा वाजवून जागा खाली करण्याचा इशारा दिला. सर्वांचा तोंडातला घास तोंडात अडकला.



अशी ही जगज्जेती आणि जगन्मान्य घंटा नेत्यांची काहीशी शत्रू झाली. अर्थात आम्हां पुढाऱ्यांची. आम्हांला भाषण करायला आवडते. ते कधी संपवावेसे वाटत नाही; पण बाजूला बसलेल्या अध्यक्षांनी घंटा वाजवली, की नाइलाजाने भाषण आवरते घ्यावे लागते. त्यावरून आठवण झाली. एकदा माझी दादरच्या वनमाळी हॉलमध्ये सभा होती. अध्यक्षांच्या टेबलावर घंटा होती. बोलायला उभे राहण्यापूर्वीच अध्यक्षांनी मला सज्जड दम भरला, ''नवलकर, १० मिनिटांत आटोपले नाही तर घंटा वाजवून खाली बसवीन.'' मी काहीच बोललो नाही. बोलता बोलता टेबलावर हात सरकवत हळूच घंटा ताब्यात घेतली व खिशात ठेवली. ते अध्यक्षांना कळलेच नाही. १०-१५ मिनिटे झाल्यावर अध्यक्ष घंटा वाजवायला गेले तेव्हा त्यांच्या लक्षात आले, की टेबलावरील घंटा बेपत्ता झाली आहे. ते कावरेबावरे झाले. टेबलाखाली पाहिले. त्यांना घंटा सापडेना. १५-२० मिनिटांनी बोलून झाल्यावर मी खिशातून घंटा काढली आणि अध्यक्षांच्या टेबलावर अलगद ठेवली आणि सांगितले, की आता वाजवा हवी तेवढी.....

**प्रश्न :**

अ. खालील प्रश्नांची उत्तरे प्रत्येकी पाच ते सहा वाक्यांत लिहा.

१. कोणत्या घंटानादाने लेखकाला भंडावून सोडले ? का ?
२. लेखकाच्या कॉलेजमधील हालचाली घंटाच कशी काय ठरवत असे ?
३. जेवणे, झोपणे, झोपेतून उठणे हे देखील लेखकाच्या बाबतीत घंटानादावर का अवलंबून होते ?
४. घंटा हा माणसाच्या आयुष्याशी निगडित विषय असतो, असे लेखक का म्हणतो ?

आ. खालील प्रश्नांची उत्तरे थोडक्यात सांगा.

१. घंटेपासून विभक्त होणे माणसाला का शक्य होणार नाही ?
२. मुंबईत घंटा सर्वाधिक लोकप्रिय कोणी केली ?
३. माणसाच्या नव्हे, तर सर्वच हालचाली घंटेने आपल्या हातात ठेवल्या आहेत असे लेखकाने का म्हटले आहे ?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. खालील विधाने स्पष्ट करा.

अ. माणसाचे संपूर्ण आयुष्य घंटेवर अवलंबून असते.

आ. अशी ही जगज्जेती आणि जगन्मान्य घंटा नेत्यांची काहीशी शत्रू झाली.

२. खालील वाक्प्रचारांचा वाक्यांत उपयोग करा.
नजर वेधून घेणे, भंडावून सोडणे, दिलासा मिळणे, प्रतीक्षा करणे.

३. 'शाळेची घंटा वाजलीच नाही तर ?' या विषयावर प्रत्येकी दहा वाक्यांचे दोन परिच्छेद लिहा.

**व्याकरण :**

खालील शब्दांचा संधी करा.
अधः + मुख, तपः + बल, मनः + वृत्ती,
यशः + निधी, अधः + पतन.





# ७. माझे माहेर वाघदरा

**अण्णा भाऊ साठे (१९२०-१९६९)**

सामान्य लोकजीवनातील दुःखाचे प्रत्ययकारी चित्रण करणारे साहित्यिक, लोकशाहीर; कथा, कादंबरी, लोकनाट्य, पोवाडे अशा विविध वाङ्मयप्रकारांत त्यांचे लेखन प्रसिद्ध. त्यांच्या अनेक कथांवर चित्रपट निघाले आहेत. 'फकिरा', 'माकडीचा माळ', 'चित्रा', 'वारणेचा वाघ' इत्यादी कादंबऱ्या; 'कृष्णाकाठच्या कथा' हा कथासंग्रह; 'शाहीर' हा पोवाडासंग्रह ही त्यांची प्रसिद्ध पुस्तके आहेत.

'माझे माहेर वाघदरा' ही कथा 'कृष्णाकाठच्या कथा' या कथासंग्रहातून घेतली आहे.

या पाठात स्त्रियांचा हुंड्यामुळे उद्ध्वस्त होणारा संसार उभा करून त्यांच्या जीवनात सुख आणणाऱ्या सावळ्याचे व्यक्तिचित्र रेखाटले आहे.

---

दिवस मावळतीकडे झुकत होता. किरणांतील धग मंदावली होती. किरणे हिरव्या घनदाट वनराजीवर वर्षत होती; त्यामुळे झाडांचा हिरवा रंग झगमगत होता, डोळे दिपवत होता. वाटेगावातून निघालेला एक गाडीमार्ग त्या किर्र झाडीत शिरून अनेक नागमोडी वळणे घेत एक डोंगर चढून टाळगावावर उतरत होता.

सावळा वाघदऱ्याकडे निघाला होता. त्याचा अवखळ कारवानी घोडा आज शांत चालत होता. सावळ्याचा धिप्पाड देह त्याच्या अफाट करणीला साजत होता. मोठे मस्तक, त्यावर तेवढेच मोठे पागोटे, रुंद चेहरा, तीक्ष्ण डोळे, दाट भुवया, नोकदार नाक, पीळदार मिशा, भरदार गर्दन, प्रचंड छाती आणि हातात तव्याएवढी लकलकीत कुऱ्हाड असा तो सावळा घोड्यावर बसला होता. त्याची नजर त्याच्यापुढे धावत होती.

समोरच्या डोंगरावरून दोन माणसे खाली येताना सावळ्याला दिसली. त्यांपैकी एक स्त्री होती आणि एक पुरुष होता. ते दोघे कोण असतील याचाच विचार सावळा करू लागला. त्याने घोड्याला टाच मारली. तो वळणापाठी वळणे ओलांडू लागला. तो वेगाने पुढे जात होता नि ती दोन माणसे भराट्याने खाली येत होती. एका वळणावर ती सावळ्याला दिसायची, तर दुसऱ्या वळणावर ती दृष्टिआड व्हायची.

त्या दोन माणसांत नि सावळ्यात एकच वळण उरले. आता ती दोन माणसे समोर

येणार म्हणून सावळ्याने घोड्याला टाच मारली आणि त्याची निराशा झाली. इतका वेळ दिसणारी ती दोन माणसे आता एकाएकी नाहीशी झाली होती. हे असे कसे झाले ? ती दोन माणसे कोठे दडली ? सावळ्याने त्या मार्गावर पाचोळ्यात उमटलेली पावले पाहिली आणि ज्या ठिकाणी त्या दोन माणसांनी मुख्य मार्ग सोडला होता, त्या जागी त्यानेही मार्ग सोडला आणि किर्र झाडीत तो त्यांचा शोध करत जाऊ लागला. जाता जाता त्याने बाजूच्या उंच गांजणीच्या गवतावर पाहिले आणि चकित होऊन तो थांबला. समोरच गांजणीचे गवत शांत उभे होते; पण काही कांड्यांचे शेंडे थरथर कापत होते. तो प्रकार सावळ्याने हेरला. तो धारदार आवाजात गरजला —

"आता भाईर या."

तशी ती दोन माणसे थरथर कापत बाहेर येऊन गुन्हेगाराप्रमाणे सावळ्यापुढे उभी राहिली. त्यांपैकी एक तरुण मुलगी होती. तिच्या तर तोंडचे पाणीच पळाले होते. सावळ्याने त्या तरुणीला पायाच्या नखापासून ते डोकीच्या केसापर्यंत न्याहाळून घेतले आणि आपली नजर दुसऱ्या इसमाकडे वळवली.

हातातील कुऱ्हाड सरळ धरून सावळा म्हणाला,



"कोण तू ? तुझं नाव काय ?"

"मी जयसिंगपूरचा दादा पाटील."

"ही तुझी कोण ?"

"ही माझी लेक काशी." दादा पाटील काखेतील गाठोडे खाली ठेवून, हात जोडून म्हणाला, "तुझं नाव मी ऐकून हाय. तुझा बोलबाला मला ठावं हाय. हे दागिनं घे, पण सावळा, माझ्या लेकीच्या अंगाला हात लावू नकं. मी लेकीच्या अब्रूसाठी दोन हजार रुपयं दीन."

तेवढ्यात सावळ्याची जोरदार चपराक दादा पाटलाच्या तोंडावर कडाडली. तसा तो कोलमडून खाली पडला. काशीबाई किंचाळली. सावळा कुऱ्हाड उगारून गरज़ला.

"उठून उभा ऱ्हा !"

"आता मारू नकं," दादा पाटील गाल चोळत उठला.

सावळा म्हणाला, "मारू नकं का ? तुला ठारच मारायला पायजे. तूच तेवढा अब्रूदार आणि आम्ही अब्रू सोडलिया असं तुला कोणी सांगितलं ? बोल —"

"माझं चुकलं," दादा पाटील खिन्न सुरात म्हणाला.

सावळा एक पाऊल पुढे टाकून म्हणाला, "सरळ उभा ऱ्हा. कुठं गेला व्हतास ?"

"टाळगावला. काशीबाईला सासरी घेऊन"

"मग परत का आणलीस ?"

"जावई काशीला घरात घेत न्हाय"

"कशापाई घरात घेत न्हाई ?"

"लगनात म्या हुंडा कबूल केला व्हता. ती रक्कम माझ्यानं चुकवली गेली न्हाय म्हनून."

"किती हुंडा कबूल केला व्हतास ?"

"पंधरा हजार."

"एवढी रक्कम का कबूल केलीस ?"

"लेकीच्या सुखासाठी आणि मातब्बर पाव्हणा जोडावा म्हणून."

"तू हैवान हाईस." सावळा जळजळीत स्वरात म्हणाला, "तुझ्या जावयाचं नाव ?"

"टाळगावचा राजाराम पाटील." दादा पाटील पडक्या आवाजात उत्तरला.



"मग चल तर." सावळा गरजला.

"कुठं ?" दादाला कापरं भरलं.

सावळा भडकला. म्हणाला, "माझ्यामागून गुमान चल."

"बरं चलतो."

ते तिघे मुख्य वाटेवर आले. घोडा तसाच उभा होता. त्याच्याकडे पाहात पुन्हा सावळ्याने हुकूम केला — "पोरीला घोड्यावर बसव आणि चल."

दादा पाटलाने काशीला घोड्यावर बसवली. आता कसला प्रसंग वाढून ठेवला आहे याचा विचार करून काशीचा प्राण कंठात आला होता.

सावळा काशीला घेऊन टाळगावची वाट चालू लागला. दिवस बुडाला. कडुसे पडले. तोंडओळख मोडली आणि सावळा काशीला घेऊन टाळगावात शिरला. राजाराम पाटलाच्या वाड्यापुढे येताच त्याने वाघ गरजावा तशी आरोळी ठोकली — "राजाराम पाटला, भाईर ये."

ती हाक ऐकून राजाराम चमकला. अशी उर्मट हाक कुणी मारली ? त्याला राग आला. चटकन उठून त्याने कुऱ्हाड घेतली. कंदिलाच्या प्रकाशात त्याची कुऱ्हाड चमकली. तो डिरकला, "कोण हाय ?"

"मी सावळा हाय." सावळा म्हणाला, "ती कुऱ्हाड तितंच टाकून म्होरं ये. न्हाय तर तुझं मुंडकं वाघदऱ्याकडं जाईल. चल ये."

सावळा हे नाव आणि ती जबर धमकी ऐकून राजारामाच्या हातची कुऱ्हाड गळून पडली. त्याला धडकी भरली. त्याच्या आई-बहिणीला कापरे भरले. म्हातारा भेदरला आणि राजाराम अंगणात आला. म्हणाला, "ना-ना-नाईक, काय म्हणता ?"

"ही बाई कोण हाय ?" सावळ्याच्या डोळ्यांत जाळ पेटला. त्याची कुऱ्हाड लकाकली.

"ही माझी बायकू — काशी." राजाराम रडवा चेहरा करून उत्तरला.

"हिला घरात का घेत न्हाईस ?"

सावळ्याने करड्या सुरात सवाल केला. एक पाऊल पुढे टाकले. वातावरण तंग झाले. राजारामाची पाचावर धारण बसली. म्हणाला, "चूक झाली, माफी करावी.



आता मी काशीला दु:ख देणार न्हाय.'' त्याने पटकन दादा पाटलाचे पाय धरले. त्याची आई नि बहीण यांनी काशीला घरात नेली, मग सावळा शांत झाला. म्हणाला,

''ही काशी माझी लेक हाय. हिला दु:ख देऊ नकं. न्हायतर मी तुझं डोस्कंच मारीन. तुझ्या घरादारावर दु:खाचा डोंगर रचीन. अरं, पंधरा हजार हुंडा दिला न्हाय म्हणून बायकूला बाहेर घालवतोस. हुंडा घेणं बरं न्हाय !''

''न्हाई न्हाई, आता अशी आगळीक व्हणार न्हाय.'' राजारामाने हात जोडले. सावळा मागे सरला. ताडकन उठून घोड्यावर बसला आणि वाऱ्याच्या वेगाने वाघदऱ्याकडे गेला.

काशीचे नांदणे लागल्यामुळे त्या खोऱ्यात एक नवे पर्व सुरू झाले होते. गावोगावच्या लेकींचे बाप सावळ्याला भेटत होते नि जावयांच्या कुकर्मांचा पाढा वाचत होते. मग सावळा त्या गावाला जाऊन त्या त्या जावयाची रग जिरवत होता. कित्येक मुलींचे संसार हुंड्यापाई नासले होते ते सावळ्यामुळे सोन्याचे झाले. अनेक लेकी सावळ्याला दुवा देत होत्या.

काशी तर सावळ्याच्या उपकाराने दिपली होती. ती मनात म्हणत होती, ''सावळ्याला उदंड आयुष्य लाभू दे. त्याला अपार बळ मिळू दे. त्याच्या तलवारीला धार येऊ दे आणि त्याच्या सुखाची मला खबर रोज कळू दे. माझे माहेर जयसिंगपुरात नसून ते वाघदऱ्यात आहे.''

**प्रश्न :**

अ. खालील प्रश्नांची प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे लिहा.

१. गांजणीच्या गवताचे शेंडे थरथर का कापत होते ?

२. दादा पाटील काशीबाईला घेऊन परत का निघाला होता ?

३. दादा पाटलाने हुंड्याची मोठी रक्कम का मान्य केली होती ?

४. राजाराम पाटलाच्या हातची कुऱ्हाड का गळून पडली ?

आ. पुढील वाक्यांचे संदर्भासहित स्पष्टीकरण करा.

१. 'ही काशी माझी लेक हाय.'

२. 'माझे माहेर जयसिंगपुरात नसून ते वाघदऱ्यात आहे.'

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. खालील वाक्प्रचारांचा अर्थ समजून घ्या आणि वाक्यात उपयोग करा.

तोंडचे पाणी पळणे, प्राण कंठात येणे, धडकी भरणे, पाचावर धारण बसणे.

२. या कथेतील प्रसंगावर आधारित नाट्यप्रवेश तयार करून तो वर्गासमोर सादर करा.
३. अण्णा भाऊ साठे यांनी लिहिलेली 'फकिरा' ही कादंबरी मिळवून वाचा.
४. 'हुंडाबंदी' या विषयावर भाषण करायचे आहे अशी कल्पना करून त्याचे टाचण तयार करा.

व्याकरण : **विसर्ग संधी**

(३) खालील जोडशब्द पाहा :

| क्रम | जोडशब्द | पोटशब्द | होणारा बदल | काय होते ? |
|---|---|---|---|---|
| १. | दुर्जन | दुः + जन | दुर् + जन | विसर्गाचा 'र्' होतो. |
| २. | निरंतर | निः + अंतर | निर् + अंतर | |
| ३. | दुरात्मा | दुः + आत्मा | दुर् + आत्मा | |
| ४. | निर्विकार | निः + विकार | निर् + विकार | |

वरील शब्दांत विसर्गाच्या मागे 'उ, इ' हे स्वर आले आहेत व पुढे स्वर किंवा मृदू व्यंजन आले असल्यामुळे विसर्गाचा 'र्' होऊन संधी झालेला दिसतो. यावरून लक्षात येईल, की **विसर्गाच्या मागे अ, आ खेरीज इतर स्वर व पुढे स्वर किंवा मृदू व्यंजन आले तर विसर्गाचा र् होऊन संधी होतो.**

खालील जोडशब्द पाहा :

नीरस = निः + रस = निर् + रस = नी + रस

नीरव = निः + रव = निर् + रव = नी + रव

येथे विसर्गाच्या मागे 'इ' हा स्वर आला असून पुढे र् हे मृदू व्यंजन आले आहे. वरील नियमाप्रमाणे विसर्गाचा र् झाला आहे. मात्र अशा 'र्'च्या पुढे पुढील शब्दाच्या प्रारंभी 'र्' आल्यास पहिल्या 'र्' चा लोप होतो व त्याच्यामागील स्वर ऱ्हस्व असल्यास तो दीर्घ होतो.

(४) खालील जोडशब्द पाहा :

| क्रम | जोडशब्द | पोटशब्द | होणारा बदल | काय होते ? |
|---|---|---|---|---|
| १. | निष्कारण | निः + कारण | नि + ष् + कारण | विसर्गाचा ष् होऊन संधी होतो. |
| २. | दुष्काळ | दुः + काळ | दु + ष् + काळ | |
| ३. | दुष्परिणाम | दुः + परिणाम | दु + ष् + परिणाम | |
| ४. | निष्फळ | निः + फळ | नि + ष् + फळ | |

वरील उदाहरणांत विसर्गाच्या मागे 'इ' व 'उ' असून पुढे क्, प्, फ् हे कठोर वर्ण आल्यामुळे विसर्गाचा 'ष्' झाला आहे. यावरून असे दिसून येते, की **विसर्गाच्या मागे इ किंवा उ असून पुढे क्, प्, फ् हे वर्ण आले तर विसर्गाचा 'ष्' होऊन संधी होतो.**

(५) खालील जोडशब्द पाहा :

| क्रम | जोडशब्द | पोटशब्द | होणारा बदल | काय होते ? |
|---|---|---|---|---|
| १. | नमस्कार | नमः + कार | नम + स् + कार | विसर्गाचा 'स्' होऊन संधी होतो. |
| २. | पुरस्कार | पुरः + कार | पुर + स् + कार | |
| ३. | वयस्कर | वयः + कर | वय + स् + कर | |
| ४. | भास्कर | भाः + कर | भा + स् + कर | |

वरील शब्दांत विसर्गाच्या पुढे 'कृ' धातूची रूपे आली आहेत व विसर्गाचा 'स्' झाला आहे. यावरून असे आढळून येईल, की **विसर्गाच्या पुढे 'कृ' धातूची रूपे आल्यास विसर्गाचा 'स्' होऊन संधी होतो.**

**अभ्यास :**

१. खालील शब्दांचा संधी करा.

अधः + मुख तपः + बल धनुः + विदया

आशीः + वचन यशः + कर निः + इच्छ

पुरः + कर्ता मनः + वृत्ती पुनः + आगमन

२. पुढील जोडशब्दांतील संधी सोडवून पोटशब्द लिहा.

रजोगुण दुर्वासना यशोधन तिरस्कार

मनोधर्म निरुदयोग उल्लंघन निष्कपट

❑ ❑ ❑



# ८. जडण-घडण

**किशोरी आमोणकर (जन्म: १९३१)**

प्रसिद्ध शास्त्रीय संगीत गायिका. त्यांच्या संगीताचे अनेक कार्यक्रम परदेशातही लोकप्रिय झाले आहेत. महाराष्ट्र शासनाचे 'महाराष्ट्र गौरव', प्रेस कौन्सिल ऑफ इंडियाचे 'कलाशिरोमणी' इत्यादी अनेक पुरस्कार त्यांना मिळालेले आहेत. भारत सरकारने 'पद्मभूषण' पुरस्कार देऊन त्यांचा गौरव केला आहे.

गाणे हे व्रत आहे. ते व्रतस्थपणे जपून परिश्रमपूर्वक साधना केल्यास गाणे आत्मसात होऊ शकते, हे या पाठात सांगितले आहे.

---

बाळपणीचा काळ मला महत्त्वाचा वाटतो, तो त्या वेळी झालेल्या संस्कारांमुळे ! माझी सारी जडण-घडण त्या वेळी झाली. माझ्या आईने त्या वेळी माझ्यावर जे संस्कार केले, त्यामुळे मी गायिका झाले; पण त्याचबरोबर एक व्यक्ती म्हणूनही चांगले जीवन जगण्याची दिशा मला मिळाली. संगीताला जीवनात परमेश्वर मानून व्रतस्थपणे जपण्याची भाविकता आईने दिली.

कुर्डू हे आमचे मूळ गाव; पण आई ते सोडून केव्हाच मुंबईत स्थायिक झालेली होती. त्यामुळे माझा जन्म मुंबईत झाला. आम्ही तीन भावंडे. मी सर्वांत थोरली. त्यानंतर एक बहीण नि सर्वांत धाकटा एक भाऊ. मी सहा वर्षांची असतानाच वडील निवर्तले. त्यामुळे आमचा सांभाळ, शिक्षण वगैरे सगळे आईनेच केले. माझे शिक्षण अर्थातच मुंबईत झाले.

माझी आई प्रख्यात गायिका. तिला आम्ही माई म्हणत असू. त्या वेळी उस्ताद अल्लादियाँ खाँसाहेबांची प्रतिभावंत शिष्या म्हणून मोगूबाई कुर्डीकर या नावाला आगळीच प्रतिष्ठा प्राप्त झाली होती. माझ्यावर गाण्याचे संस्कार तिच्यामुळेच झाले. त्याचबरोबर वत्सल, आदर्श आई म्हणूनही तिने माझ्या जीवनात एक वेगळे स्थान निर्माण केले.

वडील निवर्तल्यावर घरची परिस्थिती बिकट बनली, तरी माई खचली नाही. ती



मूळचीच धीराची, मोठ्या जिद्दीची. परिस्थितीला शरण न जाता तिने स्वतः काम करायला सुरुवात केली; कारण आपल्या मुलांनी आयुष्यात स्वतंत्रपणे काहीतरी मिळवले पाहिजे, हा तिचा ध्यास होता. दिवसभर कष्ट करून शिवाय ती गाणे जपत होती. गाणे हे तिचे व्रत होते. ते ती व्रतस्थपणानेच जोपासत होती. या साऱ्या गोष्टींचे संस्कार आपोआप माझ्यावर होत होते.

घरातले वातावरण धार्मिक होते. पुस्तकेही धार्मिकच असायची. वाटेल ती पुस्तके सरसकट घरी येत नसत. काय वाचावे, कसे वाचावे याची शिस्तही माईने लावली. गीता, तिचे मराठी भाषांतर, ज्ञानेश्वरी हे सारे त्यामुळे लहानपणीच वाचून झाले.

मला सगळी कामे करता आली पाहिजेत, यावर तिचा कटाक्ष असायचा. अभ्यासाच्या बरोबरीने तिने घरकाम शिकवले. स्वयंपाक करणे, पाट्यावर वाटणे,

धान्य कांडणे, रांगोळ्या काढणे अशा कितीतरी गोष्टी त्यातून मी शिकले आणि ही सगळी कामं व्यवस्थितच झाली पाहिजेत असा तिचा आग्रह असायचा. धान्य कांडताना मुसळ वाजता कामा नये. त्याचा इतरांना त्रास होतो, असे ती सांगायची. मी काम करताना तिचे बारीक लक्ष असायचे. त्यामुळे आपोआपच काम व्यवस्थित केले जायचे. स्वयंशिस्तीची ही जाणीव माईने करून दिली. आजतागायत ती माझ्या मनात जागी आहे.

वयाच्या दहाव्या वर्षी आंईने मला गाणे शिकवणे सुरू केले. त्या बाबतीतही ती विलक्षण जागरूक होती. काहीही शिकताना तुम्ही एकाग्रतेने ते ऐकले पाहिजे, पूर्ण लक्ष त्यावर केंद्रित केले पाहिजे हा तिचा मुख्य दंडक असायचा. ती स्वतः शिकवायला बसली, की एक तान जास्तीत जास्त दोन वेळा म्हणून दाखवायची. तिसऱ्यांदा तुम्हांला त्यातले थोडेतरी म्हणता आलेच पाहिजे. तसे जमले नाही किंवा "पुन्हा म्हणतेस का माई ?" असे हळूच विचारले तरी ती करड्या स्वरात म्हणायची, "कुठे होतं लक्ष ?" नाहीतर मग कधीकधी खूप चिडायची, अन् पुढच्या क्षणी तिथून उठून निघून जायची. तिच्या या रागावण्याची मला फार भीती वाटायची. त्यामुळे रियाझाला बसले, की माझे सारे लक्ष फक्त आणि फक्त माईच्या स्वरांकडे असायचे.

गाणे शिकणाऱ्याने अनेक गायकांचे गाणे सतत ऐकले पाहिजे; पण कुणाचे गाणे ऐकावे याबाबतही माई दक्ष असायची. वाटेल ते गाण्याचे कार्यक्रम ऐकायला तिने कधी मला जाऊ दिले नाही. संध्याकाळी एखादा कार्यक्रम असला आणि त्याला जाण्यासाठी मी हट्ट धरला की माई विचारायची, "गृहपाठ झाला का करून ?"

डोळे चोळत चोळत मी उठायची. माझे बेळगावचे मामा कधीकधी आमच्याकडे राहायला यायचे. पहाटे उठल्यावर डोळ्यांवरची झोप जावी म्हणून गरमागरम चहाचा कप देऊन ते बैठकीवर माझ्या बाजूला बसून राहायचे. माईच्या भीतीने झोप कुठल्याकुठे उडायची. स्वर आपोआप जुळायचे. इतक्या पहाटेही माईचे गाण्याकडे बारीक लक्ष असायचे. एखादा स्वर चुकला तरी ती चटकन सांगायची. एखादी तान गाऊन दाखवायची नि सांगायची, "म्हण आता ही तान एकशे आठ वेळा."

ती तान घटवता घटवता माझ्या नाकी दम यायचा; पण एकशे आठ वेळा गाऊन झाल्याशिवाय सुटका नसायची. तोपर्यंत ती तान जमायला लागायची. कधी संध्याकाळी असा रियाझ सुरू असताना काही चूक झाली, की माई म्हणायची,

"बरोबर गाता आल्याशिवाय जेवण नाही मिळणार रात्री." माईच्या या कडक शिस्तीमुळे मला चांगले वळण लागले. मेहनत करायची सवय लागली. संगीत साधनेतील माईची तन्मयता; गुरूने दिलेली विद्या जपण्यासाठी, वाढवण्यासाठी तिने केलेले जिवापाड प्रयत्न; केवळ शास्त्रीय संगीत गाण्याची तिची निष्ठा या साऱ्या गोष्टींचा माझ्या मनावर पहिल्यापासून खोलवर परिणाम झाला. आपले गाणे आपल्या आईच्या नावाला, कीर्तीला साजेसे झाले पाहिजे यासाठी आटोकाट परिश्रम करण्याचा ध्यास मला तेव्हापासून लागला.

जे करायचे ते सारे अत्यंत विनम्रपणे केले पाहिजे ही तिची आणखी एक मुख्य शिकवण. जरासाही अहंकार तिला सहन व्हायचा नाही. मला आठवते, मुंबईतील जहांगीर आर्ट गॅलरी नव्यानेच खुली झाली होती. त्या वेळी माईचे गाणे होणार होते. तानपुऱ्यावर साथीला मी बसले होते. सारे श्रोते कुतूहलाने आम्हां मायलेकींकडे बघत होते. मीही औत्सुक्याने ते न्याहाळत असल्याने तानपुरा नीट लागला नाही. तिथेच माई म्हणाली, "येत नसेल तर ऊठ नि उतर खाली !" तिचा चिडका स्वर ऐकताच माझे लक्ष आपोआप तानपुऱ्यावर स्थिरावले. अहंकार नाहीसा करणे माईला सहज जमायचे; त्यामुळेच मी या दुर्गुणापासून दूर राहू शकले. परिश्रमांनी गाणे वाढवू शकले. मला वाटते माझ्या जीवनाची, जडण-घडणीची खरी शिल्पकार माईच आहे.

**प्रश्न :**

अ. खालील प्रश्नांची प्रत्येकी चार ते पाच वाक्यांत उत्तरे लिहा.

१. बाळपणीचा काळ लेखिकेला महत्त्वाचा का वाटतो ?

२. स्वयंशिस्तीची जाणीव लेखिकेला कोणी, कोणत्या रीतीने करून दिली ?

३. रियाझाला बसल्यावर लेखिकेचे लक्ष फक्त माईच्या स्वरांकडे का असायचे ?

४. माईच्या कडक शिस्तीमुळे लेखिकेला कोणते चांगले वळण लागले ?

५. माईंना जरासाही अहंकार सहन व्हायचा नाही, हे कोणत्या प्रसंगावरून दिसून येते ?

आ. खालील प्रश्नांची प्रत्येकी दोन वाक्यांत उत्तरे द्या.

१. मुलांबाबत माईंचा कोणता ध्यास होता ?

२. वाचनाबाबत माईंनी कोणती शिस्त लावली ?

३. घरकामातील कोणत्या गोष्टी लेखिका शिकली ?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. खालील शब्दसमूहांचा वाक्यांत उपयोग करा.
नाकी दम येणे, जिवापाड प्रयत्न करणे.

२. तुमच्या परिसरातील एखाद्या संगीत शिक्षकाची अगर गायकाची किंवा वादकाची मुलाखत घेऊन त्यांच्या साधनेबाबतची माहिती मिळवा. ती माहिती वर्गात सांगा. शक्य झाल्यास, शिक्षकांच्या मदतीने किशोरी आमोणकर यांची दोन-तीन गाणी ध्वनिफितीवरून ऐका.

**व्याकरण :**

**समास**

खालील दोन उतारे वाचा :

(१) पूर्वी भूषण नावाचा **लोकांना प्रिय असा** कवी होऊन गेला. लहानपणी **विद्येच्या अभ्यासात** त्याचे लक्ष नव्हते. एकदा त्याच्या **भावाच्या पत्नीने** त्याचा अपमान केला, म्हणून **घराचा त्याग** करून तो एका **महान अशा पंडिताकडे** गेला. **गुरूची सेवा** करून त्याने विद्या मिळवली. **दिवसामागून दिवस चालले** तशी त्याची प्रतिष्ठा वाढत गेली. त्याला **राजाचा आश्रय** मिळाला. औरंगजेब बादशहाने **वस्त्रे, अलंकार वगैरे** देऊन त्याचा **चांगला मान** केला. पुढे बादशहाची **मर्जी नाहीशी** झाली, म्हणून तो **शिवाजी राजांकडे** येऊन राहिला. पुढे त्याने **शिवाजीच्या चरित्रावर** एक **महान असे काव्य** रचले.

(२) पूर्वी भूषण नावाचा **लोकप्रिय** कवी होऊन गेला. लहानपणी **विद्याभ्यासात** त्याचे लक्ष नव्हते. एकदा त्याच्या **भावजयीने** त्याचा अपमान केला, म्हणून **गृहत्याग** करून तो एका **महापंडिताकडे** गेला. **गुरुसेवा** करून त्याने विद्या मिळवली. **दिवसेंदिवस** त्याची प्रतिष्ठा वाढत गेली. त्याला **राजाश्रय** मिळाला. औरंगजेब बादशहाने त्याला **वस्त्रालंकार** देऊन त्याचा **सन्मान** केला. पुढे बादशहाची **गैरमर्जी** झाली म्हणून तो **शिवरायांकडे** येऊन राहिला. पुढे त्याने **शिवचरित्रावर** एक **महाकाव्य** रचले.

वरील दोन्ही उतारे लक्षपूर्वक वाचा. त्यांतील जाड ठशांतील शब्दांकडे क्रमाने पाहा. कोणता फरक दिसून येतो तुम्हांला ? दोन्ही उताऱ्यांचा आशय एकच आहे. पहिल्या उताऱ्यातील जाड ठशांतील शब्द सुटे किंवा वेगवेगळे आहेत; तर दुसऱ्या उताऱ्यात त्यांचा एकेक शब्द बनलेला आहे. उदाहरणार्थ, **लोकांना प्रिय** या.- ऐवजी **लोकप्रिय** असा एकच शब्द बनवलेला दिसेल. **गुरूची सेवा** याबद्दल **गुरुसेवा**;

**महान असा पंडित** याबद्दल **महापंडित** असे जोडशब्द वापरलेले दिसतील. असे जोडशब्द तयार करताना त्या सुट्या शब्दांतील संबंध दाखवणारे 'ना', 'ची' यांसारखे विभक्तिप्रत्यय किंवा काही शब्द गाळले असल्याचे आढळून येईल. अशा रीतीने आपण शब्दांची काटकसर करून छोटे व सुटसुटीत असे शब्द भाषेत वापरतो. अशा प्रकारे आपण शब्दांचा जो संक्षेप करतो त्यास **समास** असे म्हणतात. समास केल्यानंतर जो जोडशब्द तयार होतो त्यास **सामासिक शब्द** असे म्हणतात.





# ९. विरंगुळा

**यशवंतराव चव्हाण (यशवंतराव बळवंतराव चव्हाण - १९१३-१९८४)**

थोर राजकीय नेते. महाराष्ट्र राज्याचे पहिले मुख्यमंत्री. राजकारणात राहूनही साहित्यादी कलांविषयी प्रेम व आपुलकी. 'सह्याद्रीचे वारे', 'युगांतर', 'ऋणानुबंध', 'भूमिका' आणि 'कृष्णाकाठ' (आत्मचरित्र) इत्यादी पुस्तके प्रसिद्ध.

हा पाठ 'सह्याद्रीचे वारे' या पुस्तकातून घेतला आहे.

जीवनातला आनंद लुटण्यासाठी माणसाला काही ना काही विरंगुळा हवा असतो. आपला विरंगुळा कोणता, ते या पाठात लेखकाने सांगितले आहे.

---

प्रत्येक माणूस स्वत:चे कार्यक्षेत्र निवडत असतो आणि त्यामध्येच तो आपले सबंध आयुष्य व्यतीत करत असतो; परंतु त्यातही त्याला स्वत:चा असा एक विरंगुळा म्हणून असतोच. जीवनाच्या रोजच्या धकाधकीतून त्याला जे काही विसाव्याचे क्षण मिळतात, त्या वेळी हा विरंगुळा त्याला जीवनातील उच्च प्रतीचा आनंद मिळवून देत असतो. अर्थात विरंगुळा माणसाला अनेक प्रकारे मिळू शकतो. किंबहुना त्याला लाभणारा विरंगुळा हा त्याच्या आवडी-निवडीवर व व्यक्तिमत्त्वावर अवलंबून असतो. तसे नसते, तर माणसाला ज्यामुळे विरंगुळा मिळतो, त्यावरून त्याच्या व्यक्तिमत्त्वाचे निरनिराळे पैलू आपणांस दिसले नसते. माझा विरंगुळा कशात आहे ? माझ्या दृष्टीने हा मोठा कठीण प्रश्न आहे.

मी जेव्हा माझ्या जीवनाकडे दृष्टिक्षेप टाकतो, त्या वेळी प्रथम माझ्या मनासमोर जर कोणते चित्र उभे राहत असेल, तर मी ज्या ठिकाणी वाढलो, खेळलो आणि ज्या ठिकाणी माझे व्यक्तिमत्त्व घडले त्या माझ्या कऱ्हाड गावचे. माझ्या पाठीमागच्या सर्व व्यापांतून सवड काढून कऱ्हाडच्या प्रीतिसंगमावर काही काळ निवांतपणे घालवावा अशी इच्छा वारंवार माझ्या मनात येते. सुदैवाने नुकतीच मला तशी संधी मिळाली आणि कऱ्हाडच्या प्रीतिसंगमावर मी थोडा वेळ जाऊन आलो. त्या वेळी भूतकाळातील हृदय आठवणींनी माझे मन भरून आले. माझ्या गतजीवनाचा चित्रपट झरझर माझ्या डोळ्यांसमोर येऊन गेला. माझी आई, माझे बंधू व इतर कुटुंबीय मंडळी या सर्वांच्या



प्रेमळ सहवासात घालवलेले दिवस मला आठवले व त्यांच्या सहवासात मिळालेल्या अपूर्व आनंदाच्या गोड स्मृती माझ्या हृदयाला स्पर्श करून गेल्या. मी कितीही थकलेला असलो, तरी घरातील आणि कुटुंबातील प्रेमळ व निर्मळ वातावरणाने माझे मन उल्हसित होते. देवघरातील नंदादीपाच्या मंद प्रकाशामध्ये भाविकांच्या मनात ज्या सुखद लहरी उठतात,त्यांचे वर्णन नुसत्या शब्दांनी कसे करता येणार ? भावनेची भाषा भावनेलाच समजते. कुटुंबातील मंडळींमध्ये बसून हास्यविनोद करत, गप्पागोष्टी करत वेळ घालवण्यात केवढा आनंद असतो ! माझ्या कुटुंबातील मंडळींबरोबर अशाप्रकारे काही वेळ घालवणे हा माझा एक आवडता विरंगुळा आहे.

लहानपणी शाळेत असताना किंवा तरुणपणी राजकीय चळवळीत रमलो असताना मला कधी कधी काव्यकल्पना सुचत आणि त्या मी त्या वेळी कागदावरदेखील उतरवत असे. कालजत असल्यापासून काव्य आणि साहित्य यांचे मला फार मोठे आकर्षण वाटत असे आणि अद्यापही ते वाटते. आजदेखील वेळात वेळ काढून साहित्याची गोडी मी चाखतो आणि त्यामुळे मला मनमुराद आनंद मिळतो. मराठीतील



कादंबरीकारांपैकी वि. स. खांडेकर यांच्या कादंबऱ्या आणि ना. सी. फडके यांच्या कथा मी अनेक वेळा अतिशय उत्सुकतेने वाचल्या आहेत आणि त्यांचा आनंद मनमुराद लुटला आहे. संत ज्ञानेश्वरांच्या वाङ्मयातील गोडवाही मी अतिशय भाविक मनाने चाखला आहे. ज्ञानेश्वरांचे काव्य हा मराठी भाषेचा महान ठेवा आहे. साहित्यिकांच्या शब्दांतील विलक्षण सामर्थ्य पाहून कित्येक वेळा आपले मन थक्क होते. मॅक्झिम गॉर्की यांची 'आई' ही कादंबरी मी ज्या वेळी प्रथम वाचली त्या वेळी माझ्या हृदयात अतिशय कालवाकालव झाली. असे काही अक्षरवाङ्मय वाचले, की आपण आपले स्वत्व क्षणभर विसरून जातो आणि सुखाच्या निवांत क्षणांत रममाण होतो.

वेरूळ येथील कैलास लेणी ज्या वेळी मी प्रथम पाहिली त्या वेळच्या माझ्या भावना मला आजही आठवतात. ती कैलास लेणी पाहून माझे मन भारावून गेले. आजूबाजूचे जे लोक मला त्यांच्यासंबंधी माहिती देत होते, त्यांचे अस्तित्वदेखील मी क्षणभर विसरून गेलो; माझे 'मीपण' मी विसरलो आणि किंचित एका स्वर्गीय अशा आनंदात

रममाण झालो. मला वाटते, आजकालच्या धकाधकीच्या जीवनात, व्यक्तीच्या आयुष्यात असा क्षण येणे हाच त्याला लाभणारा खरा विरंगुळा होय. असा विरंगुळा प्रत्येकाच्या जीवनामध्ये जितका जास्त येईल तितके त्याचे जीवन अधिक सुखी बनेल. श्रेष्ठ कलाकृतींमध्ये जीवन फुलवण्याची अशी अमर्याद शक्ती असते.

साहित्याची गोडी आपण एकांतात चाखतो, पण समाजात प्रत्यक्ष लोकांमध्ये बसून नाटक पाहणे, लोकनाट्याची मौज लुटणे, कुस्त्यांची रणधुमाळी अवलोकणे किंवा क्रिकेटची टेस्ट मॅच पाहण्यात दंग होणे यांतील मौज काही औरच आहे. एखाद्या जुन्या नाटकाचा पडदा वर जाऊन पेटीचे सुमधुर स्वर वातावरणात घुमू लागले किंवा सारंगीचे मृदू सूर कानी पडले, की एका निराळ्याच जगात आपण प्रवेश करतो. त्या वेळी आपल्या भावना कशा दोलायमान होतात त्याचे वर्णन शब्दांनी करता येणार नाही. बालगंधर्वांची ती जुनी गाणी आठवली किंवा त्या काळातील नटश्रेष्ठांच्या अभिनय कौशल्याची नुसती आठवण झाली, की गोड स्मृती चाळवल्या जातात. केशवराव दाते यांच्यासारख्या कसलेल्या नटाच्या भूमिका आणि जुन्या काळातील ती भरदार नाटके, यांच्या आठवणीदेखील किती सुखद वाटतात. जीवनातल्या अशा कितीतरी गोष्टी आहेत, की ज्यांपासून मी अक्षरशः मनसोक्त आनंद लुटला आहे. बडे गुलाम अली खाँ, भीमसेन जोशी, हिराबाई बडोदेकर यांच्यासारख्या सुप्रसिद्ध कलाकारांचे गायन म्हणजे जीवनातील आनंदाचा उच्चांक होय.

साहित्य, संगीत, नाट्य, चित्र यांसारख्या कलांनी माणसाच्या जीवनाला समृद्धी आणलेली आहे. मानवाला सुसंस्कृत बनवले आहे; परंतु एखादा माणूस साक्षर असूनदेखील सुसंस्कृत नसतो; कारण जीवनातील आनंद कसा लुटावा हे त्याला ठाऊक नसते. कलेचे रहस्य जाणण्याची दृष्टी त्याला प्राप्त झालेली नसते, त्यामुळे जीवनात त्याचे मन कोठेच रमत नाही. माझ्या जीवनाकडे मी जेव्हा दृष्टिक्षेप टाकतो त्या वेळी या सर्वांतून लाभलेल्या विरंगुळ्याच्या क्षणांमुळे मला जीवन आनंदमय वाटते व नव्या क्षितिजाच्या ओढीने माझे मन आजही भारावून जाते.

**प्रश्न :**

अ. खालील प्रश्नांची उत्तरे प्रत्येकी पाच ते सहा वाक्यांत लिहा.

१. विरंगुळ्याविषयी कोणते विचार लेखकाने व्यक्त केले आहेत ?

२. कऱ्हाडच्या प्रीतिसंगमावर गेल्यावर लेखकासमोर कोणते चित्र उभे राहिले ?

३. अक्षरवाङ्मय वाचले, की आपण आपले स्वत्व विसरून जातो असे लेखकाने का म्हटले आहे ?
४. वेरूळ येथील कैलास लेणी पाहून भारावून गेलेल्या लेखकाच्या मनात कोणते विचार आले ?

आ. खालील प्रश्नांची प्रत्येकी दोन ते तीन वाक्यांत उत्तरे लिहा.
१. एखादा माणूस साक्षर असूनदेखील सुसंस्कृत नसतो असे का म्हटले आहे ?
२. जीवन आनंदमय आहे असे लेखकाला कशामुळे वाटते ?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. खालील वाक्यांचे स्पष्टीकरण करा.
अ. भावनेची भाषा भावनेलाच समजते.
ब. श्रेष्ठ कलाकृतींमध्ये जीवन फुलवण्याची अमर्याद शक्ती असते.
२. हृदयाला स्पर्शून जाणे, मन भारावून जाणे या वाक्प्रचारांचा वाक्यांत उपयोग करा.
३. 'माझे विरंगुळ्याचे क्षण' या विषयावर वर्गात १५ ते २० वाक्ये बोला.

**व्याकरण :**

## संधी व समास

यापूर्वी 'संधी' कशास म्हणतात हे आपण शिकलो. 'गज + आनन' याचा 'गजानन' असा संधी झाला. येथे 'गज' या शब्दातील शेवटचा वर्ण 'अ' व 'आनन' या शब्दाच्या प्रारंभीचा वर्ण 'आ' यांचा संयोग होऊन (अ + आ) 'गजानन' हा शब्द तयार झाला. पण 'गजाचे आनन आहे ज्याला तो' याबद्दल आपण 'गजानन' असा एक शब्द बनवतो तेव्हा आपण काय करतो ? 'गज' व 'आनन' या दोन शब्दांतील संबंध दाखवणारे जे इतर शब्द आहेत ते गाळून 'गजानन' असा एक जोडशब्द बनवतो. 'भीम आणि अर्जुन' या तीन शब्दांऐवजी 'भीमार्जुन' असा जोडशब्द तयार करताना 'आणि' हा शब्द आपण गाळतो. 'देवासाठी घर' या दोन शब्दांऐवजी 'देवघर' असा एकच शब्द बनवताना 'साठी' हे शब्दयोगी अव्यय आपण गाळतो.

अशा रीतीने 'संधी'मध्ये दोन शब्दांतील जवळजवळचे दोन वर्ण एकमेकांत मिसळून त्यांचा एक जोडशब्द आपण बनवतो. वर्णांच्या या मिसळण्याला **संधी** असे म्हणतात.

पण जेव्हा दोन शब्द एकमेकांशेजारी येतात तेव्हा त्यांच्यातील विभक्तीचे प्रत्यय किंवा त्यांचा संबंध दाखवणारे इतर शब्द गाळून त्यांचा एक जोडशब्द आपण

बनवतो. शब्दांच्या अशा एकीकरणाला **समास** असे म्हणतात.

समासात ज्या दोन शब्दांचा एक जोडशब्द तयार होतो त्यास **सामासिक शब्द** असे म्हणतात. 'लोकप्रिय' हा सामासिक शब्द होय. हा सामासिक शब्द कसा तयार झाला हे स्पष्ट करण्यासाठी आपण त्याची फोड करून सांगतो. या फोड करून दाखवण्याच्या पद्धतीला **विग्रह** असे म्हणतात. सामासिक शब्दांचा विग्रह कसा करून दाखवतात हे पुढील तक्त्यात पाहा :

| | सामासिक शब्द | विग्रह |
|---|---|---|
| १. | विटीदांडू | विटी आणि दांडू |
| २. | ज्ञानामृत | ज्ञान हेच अमृत |
| ३. | क्रीडांगण | क्रीडेसाठी अंगण (मैदान) |
| ४. | पंचपाळे | पाच पाळ्यांचा समूह |
| ५. | घरोघर | प्रत्येक घरी |
| ६. | लंबोदर | लंब (=मोठे) आहे उदर ज्याचे तो (गणपती) |

### समासाचे प्रकार

समासात कमीत कमी दोन शब्द असावे लागतात. त्यांतील कोणत्या शब्दाला प्राधान्य असते त्यावर त्या समासाचे प्रकार ठरतात. पुढील शब्द पाहा :

| | सामासिक शब्द | विग्रह | महत्त्वाचा शब्द | कोणते पद महत्त्वाचे ? |
|---|---|---|---|---|
| १. | दररोज | प्रत्येक दिवशी | दर | पहिले |
| २. | घरजावई | घरचा जावई | जावई | दुसरे |
| ३. | रामलक्ष्मण | राम आणि लक्ष्मण | राम, लक्ष्मण | दोन्ही |
| ४. | नीळकंठ | निळा आहे कंठ ज्याचा तो | (दोन्ही नाहीत) | दोन्ही नाहीत |

यावरून असे आढळून येईल, की काही सामासिक शब्दांत पहिले पद प्रधान म्हणजे महत्त्वाचे असते, काहींत दुसरे पद प्रधान असते. काहींत दोन्ही पदे प्रधान असतात तर काहींत दोन्ही पदे प्रधान नसून त्याने सूचित केलेल्या निराळ्याच पदाचा बोध होतो.

समासात कोणते पद अथवा कोणती पदे महत्त्वाची असतात यावरून समासाचे मुख्य प्रकार चार संभवतात. ते पुढीलप्रमाणे :

(१) पहिले पद महत्त्वाचे असलेले = (अव्ययीभाव)

(२) दुसरे पद महत्त्वाचे असलेले = (तत्पुरुष)

(३) दोन्ही पदे महत्त्वाची असलेले = (द्वंद्व)

(४) दोन्ही पदे महत्त्वाची नसून त्यांनी सूचित केलेले वेगळेच पद महत्त्वाचे } (बहुव्रीही)

यांचा आपण पुढील पाठांत क्रमाने विचार करू.





# १०. नवा पैलू

**प्रतिभा पानट (जन्म : १९४२)**

अमरावती येथील श्री बुलिदान राठी मूक-बधिर विद्यालयामध्ये शिक्षिका. मूक-बधिर व अपंग यांच्या समस्यांची उकल करणाऱ्या अनेक कथा, लेख प्रसिद्ध आहेत.

मुक्या व बहिऱ्या मुलांची योग्य वेळी तपासणी करून, त्यावर उपचार केल्यास ती मुले ऐकू-बोलू शकतात. 'शाळा' हा एक चांगला उपाय आहे, हे या कथेतून सांगितले आहे.

---

आजी आपल्या चार-पाच वर्षांच्या नातवाला घेऊन बसमधून उतरल्या. आभाळ अगदी गच्च भरून आलेले होते. क्षणभरातच पाऊस कोसळणार असे दिसत होते. स्टँडपासून दवाखाना अगदी जवळ असल्याने आजी नातवाला घेऊन चालत निघाली. आजीचा नातू दिगू आजूबाजूला पाहात हळूहळू चालत होता.

"चलं रे बाबा लवकर लवकर. पाऊस सुरू व्हायच्या आत पोहोचलं पाहिजे दवाखान्यात." आजी दिगूला म्हणाली, पण... !

'त्याला सांगून काय उपयोग ? ऐकू कुठं येतंय त्याला ?' आजी खंत करत पुटपुटली आणि स्वत:शीच पुटपुटत पुढे चालू लागली.

'तेच तर गाऱ्हाणं शहरच्या डॉक्टरला ऐकवायला आलेय. गावच्या डॉक्टरला कळत नाही ते शहरच्या डॉक्टरला कळतं असं ऐकलं होतं.' आजीला स्वत:शीच बोलायची सवय होती.

दवाखान्याच्या बंद दाराकडे आजीचे लक्ष गेले. आता कुठे थांबणार ? आजी विचारात पडली. एवढ्यात रिक्षाचा जोराचा आवाज ऐकू आला. तिने मागे वळून पाहिले, तर रिक्षाच्या समोर दिगू उभा होता आणि रिक्षावाला त्याला काहीतरी बोलत होता, "अरे पोरा, जीव जास्त झाला आहे का ? नदी आहे जीव द्यायला. आमच्यावर नसतं संकट कशाला आणतोस ? केव्हाचा आवाज देतोय पण ढिम्म हालत नाही ! बहिरा आहे की काय ?"

त्याने खसकन शर्ट धरून त्याला बाजूला केला अन् निघून गेला.



आजीच्या डोळ्यांत चटकन पाणी आले. दिगूच्या बहिरेपणावर खेड्यात इलाज झाला नाही; म्हणून शहराच्या डॉक्टराला तरी यश येते का हे बघायला ती आली होती.

ज्या दिवशी दिगू बहिरा आहे असे लक्षात आले, त्या दिवसापासून त्याचे घरदार सर्व काळजीत पडले आहे. आता गावातल्या लोकांच्या सांगण्यावरून आजी त्याला घेऊन वेड्या आशेने शहराच्या डॉक्टरकडे आली होती.

दवाखाना बंद होता. बाहेर मुसळधार पाऊस. तशीच दिङ्मूढ होऊन ती भिंतीच्या आडोशाला थांबून राहिली. इतक्यात एक तरुण मुलगी 'वत्सला', आजीच्या शे[illegible], येऊन उभी राहिली. आजी शहराच्या डॉक्टरबद्दल स्वतःशीच बोलत होती. ते र रे वत्सलेने ऐकले होते. रिक्षावाल्याने दिगूला हटकले होते, तेही तिने पाहिले होते. काहीतरी मनाशी ठरवून ती आजींना म्हणाली,

''कोणत्या गावाला जायचं आजी ? पाऊस तर फार पडतोय.''

''कोण ग बाई तू ?''

''माझं नाव वत्सला आहे. शिक्षिका आहे मी.'' वत्सला म्हणाली.

''अस्सं होय ? मला वाटलं, तू एखादी डॉक्टरच आहेस. ज्याच्यासाठी मी शहराला

आले होते, तो दवाखाना बंद आहे. काय करावं कळेनासं झालंय बघ.'' आजी बोलली.

''एवढ्या पावसात कुठे जाता ? या वादळात झाडंबिडं रस्त्यात पडतात. आजी, त्यापेक्षा माझ्या घरी चला.''

''नको,घरी या पोराची आई वाट पाहील.''

''पाहू द्या. आजची रात्र माझ्याकडे राहा.उद्या मी तुम्हांला जे काय दाखवीन ते पाहून हसत घरी जाल.'' वत्सलाने आजीला मोहात पाडले.

आजी थोडीशी विचारात पडली आणि मनाशी काहीतरी ठरवून म्हणाली,

''असं होय ? हसणं मिळणार असेल तर तुझ्या घरी येते मी. गेली पाच वर्षे झालीत हसणं विसरलो आम्ही !''

पाऊस ओसरल्यावर आजी, दिगू व वत्सला घरी गेले. जेवणे झाली. गप्पा मारणे सुरू झाले.

वत्सला ही मूक-बधिर मुलांच्या शाळेत शिक्षिका होती. अत्यंत आनंदी, हसऱ्या स्वभावाची.

तिने विचार केला, की बोलकी मुले शिकतात, हसतात, खेळतात, आनंदी जीवन जगतात. त्यांना कोणीही शिकवील, पण ज्यांच्या वाट्याला बहिरेपणाचे, मुकेपणाचे दु:ख आले आहे, त्यांना कोण शिकवणार ? कोण सुखवणार ? त्या मूक कळ्या कोण उमलवणार ? त्यांच्यातील स्वत्व जागवून त्यांच्या चेहऱ्यावर अभिमानाचे, विश्वासाचे हास्य फुलवायचे, हा पक्का निर्धार करूनच ती मूक-बधिर मुलांच्या शाळेत शिक्षिकेचे काम करत होती.

आजीशी गप्पा मारत तिने त्यांची सर्व माहिती काढून घेतली.

आजी पण कितीतरी दिवसांनी असे मनमोकळे बोलायला मिळाल्यागत बोलत होती.

''आमच्याकडे कोणीच असं मूक-बधिर नाही पोरी. त्यामुळे आम्हांला फार धक्का बसला.'' आजी हळहळली.

''याच्या जन्माच्या वेळी याच्या आईला काही झालं होतं का ?'' वत्सलाने माहिती घेण्याच्या हेतूने विचारले.

''होय ग बाई, तिच्या अंगभर गोवर निघाला होता.''

वत्सला या विषयात प्रशिक्षित असल्याने दिगूच्या बहिरेपणाचे कारण काय ते समजली.

''मग तुम्ही काय केलंत ?''

''काय करणार ? आमच्यां खेड्यात काय उपाय ?'' डॉक्टर म्हणाले, ''याला ऐकू येणार नाही अन् तो बोलणारही नाही.''

वत्सलाला खूप वाईट वाटले. ऐकू येत नाही म्हणजे सारे संपले असे नाही. शहरात त्याच्या कानांची तपासणी करून त्याचा श्रवणऱ्हास वेळीच पाहिला असता, त्यानुसार श्रवण यंत्र दिले असते, तर आतापर्यंत तो ऐकू-बोलू शकला असता. किती लवकर हे व्हायला पाहिजे होते. मुलांची पहिली पाच वर्षे म्हणजे भाषा शिकण्याचे वय. वत्सलाला चीड आली.

तिने आजींना विचारले,

''तुमच्या गावात आणखी अशी मूक-बधिर मुलं असतील ना ?''

''आहेत. फिरतात बिचारी रस्त्यानं. आईबापांना पोसायला जड होतात. काही काही मुलं गुन्हा नसताना बोलता न आल्यानं पोलिसांचा बेदम मार खातात.''

''एक चौदा वर्षांची पोरगी आहे. आईवडील होते तोवर ठीक. भाऊ नाही, बहिणी आपापल्या संसारात !''

''अरेरे ! आजीबाई, या मुलांना शिकवलं,तर यांचं आयुष्य एवढं बरबाद होत नाही. यांना उद्योग शिकवले,तर ते पैसा मिळवतात. यांना रोजचे व्यवहार शिकवले तर यांचे कोठेही अडत नाही.'' वत्सलाने आजीला समजावत सांगितले.

दुसऱ्या दिवशी आजीबाईंना घेऊन वत्सला शाळेत आली. मुक्या मुलांची शाळा असते हे पाहून आजीला आश्चर्य वाटले. हेडफोन्स लावून बसलेली मुले, माईकमधून शिकवणाऱ्या बाई, हे सगळे आजीला नवलच वाटत होते.

शाळेतील एक बाई एका छोट्या मुलाला यंत्राच्या साह्याने गोष्ट शिकवत होत्या, हे वत्सलाने आजीला दाखवले.

आजी उत्सुकतेने बघत होत्या. बहिऱ्या मुलाच्या तोंडून बाहेर पडलेले उच्चार टिपायला त्यांचे कान सावध झाले होते आणि ते मूल बाईंसारखेच हसत हसत बोलले तेव्हा तर आजींच्या अंगभर आनंद लहरी उसळल्या.

आजी खूपच उल्हसित झाली. वत्सला त्यांना यंत्राची माहिती करून देत होती.



"यंत्रामुळे बहिऱ्या मुलाला आवाज ऐकू येतो. आवाज आल्याच्या आनंदाने ते आपल्या चेहऱ्याकडे पाहते, आपल्या ओठांच्या हालचाली पाहते व तसे बोलण्याचा प्रयत्न करते."

तिने त्यांना ग्रुप हिअरिंग एड्स दाखवले, इंडक्शन लूप सिस्टीमची खोली दाखवली अन् हळूच आजीला विचारले, "काय आजी, मग दिगूला ठेवायचं का आमच्या शाळेत ?"

आजी खुदकन हसली अन् म्हणाली, "होय ग, माझा दिगू येऊ दे तुमच्या शाळेत."

"पण..." असे पुटपुटत आजी एका वेगळ्या स्वप्नात हरवली.

आजीला नातवाच्या दुःखावरून सर्वच मुक्यांच्या दुःखाची जाणीव झाली होती. तिच्या मनात विचार आला, 'आपल्याही खेड्यात अशी मूक-बधिर शाळा काढली तर... !'

मनाशी काहीतरी ठरवून आजी म्हणाली, "पोरी, माझ्या गावी अशी शाळा काढून देशील ?"

आजींना वाटले खूप सोपे काम आहे हे.

शाळा काढायची म्हणजे 'घर पाहावे बांधून, लग्न पाहावे करून' म्हणतात, त्याप्रमाणे अनंत अडचणी, अनेक प्रश्न, सर्वांत मोठा प्रश्न पैशाचा; पण आजीचे स्वप्न व चेहऱ्यावरचे हास्य मिटवावेसे तिला वाटले नाही. तिने आजीला मोजक्या गोष्टी सांगितल्या.

''आजी, शाळा काढायची म्हणजे जागा पाहिजे, पैसा पाहिजे. यंत्रे किती महाग ?''

''वत्सलाबाई, आम्ही खेड्यातले लोक शिक्षणानं अडाणी राहिलो; पण कष्टानं आम्ही शेती खूप जमवली. एक शेत विकलं, तर लाखाला जाईल.''

आता मात्र वत्सला थक्क होऊन ऐकत होती.

''म्हणजे एवढा पैसा आजी देणार तुम्ही ? मुक्यांच्या शाळेला ?''

''अगं बाई, त्या पैशात केवढं काम होईल माझ्या गावाचं ? आमचे अडाणी लोक नवससायास करण्यात कर्जबाजारी होतात. मुकं मूल हेच आधी दु:ख, त्यात आणखी कर्ज. त्यापेक्षा माझ्या गावची मुलं शाळेत जातील, शिकतील, त्यांना वळण लागेल. स्वत:च्या पायावर उभी राहतील.''

आजीने या मूक-बधिरांसाठी काही करण्याचे ठरवले आणि तिने तसे बोलून दाखवले. आजीच्या विचारातील या नव्या पैलूचे दर्शन होताच वत्सलाचे अंत:करण भरून आले. ती म्हणाली,

''आजी, मी म्हटलं होतं ना, उद्या मी दाखवीन ते पाहून तुम्ही हसत घरी जाल म्हणून !''

''होय ग वत्सला, त्या कालच्या पावसाने माझ्यावर फार उपकार केले. मी शहरातल्या डॉक्टराकडे निघाले होते. तुझ्या रूपात मला डॉक्टरच भेटला बघ.''

आजी हसू लागल्या.

आजीच्या उत्तराने वत्सलाही आनंदित झाली.

तिलाही हसू आले.

कालपासून ही आपल्या आईसारखी दिसणारी बाई हसतेय, आजी हसतेय हे पाहून कसे का होईना दिगूच्या चेहऱ्यावर हसू उमटले !

**प्रश्न :**

अ. खालील प्रश्नांची प्रत्येकी पाच ते सहा वाक्यांत उत्तरे लिहा.

१. रिक्षावाला दिगूला काय म्हणाला ?

२. वत्सलाने मुक्या मुलांबाबत कोणता विचार केला होता ?

३. वत्सलास कोणत्या गोष्टींची चीड आली ?

४. आजींनी शाळेत कोणत्या गोष्टी पाहिल्या ?

आ. खालील प्रश्नांची प्रत्येकी तीन ते चार वाक्यांत उत्तरे लिहा.

१. आजी विचारात का पडली ?

२. वत्सलाने आजींना घरी का नेले ?

३. दिगू मुका का झाला होता ?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. वत्सलाचे व्यक्तिचित्रण करणारी वाक्ये शोधून लिहा.

२. पाठाचे 'नवा पैलू' हे नाव कसे सार्थ ठरते हे दहा वाक्यांत लिहा.

३. 'आजी थोर विचारांची होती' याबाबत वर्गात दहा-बारा वाक्यांत माहिती सांगा.

४. समाजसेवा, समाजसेवक, महारोग, जीवनसर्वस्व, हृदयद्रावक या सामासिक शब्दांची फोड करून समासाची नावे सांगा.

**व्याकरण :**

### अव्ययीभाव समास

पुढील वाक्यांतील सामासिक शब्द पाहा व त्यांतील कोणती पदे महत्त्वाची आहेत ते शोधून काढा :

(१) गांधीजींनी देशासाठी **आमरण** कष्ट सोसले.

(२) प्रत्येकाने गरजूंना **यथाशक्ती** मदत करावी.

(३) विद्यार्थ्यांनी **दररोज** नेमाने व्यायाम करावा.

(४) श्याम वर्गात कधीच **गैरहजर** राहत नाही.

वरील वाक्यांतील जाड ठशात छापलेले शब्द सामासिक शब्द असून ते कसे बनले आहेत हे पुढील कोष्टकात पाहा :

| क्रम | सामासिक शब्द | पोटशब्द | विग्रह व अर्थ | कोणते पद महत्त्वाचे ? |
|---|---|---|---|---|
| १. | आमरण | आ + मरण | मरेपर्यंत | पहिले |
| २. | यथाशक्ती | यथा + शक्ती | शक्तीप्रमाणे | पहिले |
| ३. | दररोज | दर + रोज | प्रत्येक रोजी | पहिले |
| ४. | गैरहजर | गैर + हजर | हजर नसलेला | पहिले |

वरील सामासिक शब्दांवरून काय आढळून येते ?

(१) यांतील प्रत्येक सामासिक शब्दात पहिले पद महत्त्वाचे आहे.

(२) 'आमरण, यथाशक्ती, दररोज, गैरहजर' हे शब्द त्या त्या वाक्यातील क्रियेबद्दल अधिक माहिती सांगतात. म्हणजे या सामासिक शब्दांचा उपयोग वाक्यात क्रियाविशेषण अव्ययासारखा केलेला आहे.

अशा रीतीने, **ज्या समासातील पहिले पद महत्त्वाचे असते व ज्या सामासिक शब्दाचा उपयोग वाक्यात क्रियाविशेषण अव्ययासारखा केलेला असतो त्या समासास अव्ययीभाव समास म्हणतात.**

या समासाची आणखी काही उदाहरणे : आजन्म, प्रतिदिन, यावज्जीव, घरोघर, दारोदार, गल्लोगल्ली, यथाविधी, दिवसेंदिवस, हरघडी, बिनधोक, गैरशिस्त, दरसाल.





# ११. जिवलग मित्र : वृक्ष

**व्यं. रा. वनमाली (व्यंकटेश रामचंद्र वनमाली)**

इंग्रजीचे प्राध्यापक. 'आदिमाया' ही कादंबरी व त्यांचे इतर स्फुट लेखन प्रसिद्ध आहे. माणसाच्या जीवनात आनंद निर्माण करणाऱ्या वृक्षांचे महत्त्व या पाठात वर्णिले आहे.

कधी कधी इतका कंटाळा येतो, की काही करावेसे वाटत नाही हा अनुभव पुष्कळांना असेलच. अशा वेळी वाचू नये, लिहू नये, कोणाशी बोलू नये, कसला विचार करू नये असे वाटते. असल्या मन:स्थितीचे जड ओझे दूर फेकायचे असल्यास संध्याकाळी बाहेर पडावे व जेथे पुष्कळ वृक्ष असतील तेथे जावे. जुन्या मित्रांच्या संगतीत वेळ घालवल्याप्रमाणे तुम्हांला हलके वाटेल.

अतिपरिचयाची वस्तू म्हणून आपण वृक्षांचा अनादर करतो; पण त्यांच्यासारखा सोबती तुम्हांला मिळायचा नाही. तुम्ही केव्हाही त्यांच्याकडे जा, त्यांचे सौंदर्य तुम्हांला रिझवील व सहवास प्रिय वाटेल. सूर्य उगवण्याच्या आधी त्यांच्याकडे बघा. ध्यानस्थ मुनिजनांप्रमाणे ते पवित्र वाटतील. संध्याकाळी सूर्याची मावळती किरणे वृक्षशिखरांवर पडली म्हणजे तो तांबूस रंग ओसरेपर्यंत तेथून तुमचा पाय उचलायचा नाही. पावसाळ्यात पाने स्वच्छ धुऊन निघाली म्हणजे हरितवसना नववधूप्रमाणे झाडे प्रसन्न दिसतात. इतकेच काय, पण इंग्रजीतील एक कवी कोलरिज म्हणतो त्याप्रमाणें फांद्या पर्णहीन होऊन वीणेच्या तुटलेल्या तारांप्रमाणे दिसायला लागल्या व एकटेच पान वाऱ्याशी फडफडत असले तरी वृक्षाची शोभा कमी होत नाही.

संध्याकाळी अगदी निष्पर्ण झालेला वृक्ष सकाळी उठून खिडकीतून बाहेर पाहताच इवलाल्या, कोमल, मंद हिरव्या पल्लवांनी भरलेला दिसला म्हणजे आश्चर्याचा जो नाजूक धक्का बसतो व अकल्पित आनंद होतो तो अवर्णनीय आहे. वसंत ऋतूच्या दिवसांत तर वृक्षांचे सौंदर्य अप्रतिम असते. कोठेही बाहेर जा, वृक्ष डवरलेले दिसतील. कांचन तर असा बहरतो, की या फिकट निळ्या फुलांच्या गर्दीत पान कुठे दिसतच नाही. कोणत्याही वनात, गोंडवनात या वेळी चला. पलाशांचा लालभडक फुलोरा बघितला म्हणजे दुरून तुम्हांला सारे रान पेटल्यासारखे वाटेल.

वृक्षांच्या रंगरूपांवरच मी लुब्ध आहे असे नव्हे, तर त्यांचा सौरभ, त्यांच्या सावल्या व त्यांचे संगीत सारेच मला अत्यंत प्रिय आहे. मंजरींनी नटलेल्या आम्रवृक्षांवरून नाजूक वायुलहरी गेली म्हणजे उधळला जाणारा सौरभ, शुक्लपक्षातील वृक्षांखालच्या काळ्यापांढ्या सावल्या, वंशवृक्षाच्या बेटात वाऱ्यामुळे होणारा मंजुळ रव, गावाबाहेरच्या टेकाडावर उज्ज्वल ध्येयाकडे पाहिल्याप्रमाणे वर बघणारा तमाल, समुद्रकिनारी महापुरुषांच्या सभेप्रमाणे थाटलेली सुरूची दाट राई हे निसर्गाचे भांडार मला अत्यंत प्रिय आहे, म्हणूनच वृक्षांविषयी मला आदर वाटतो.

बोधिवृक्षाखाली बसणारा बुद्ध, वनस्पतींना हृदय आहे हे सांगणारा जगदीश बोस, देवदारच्या वनात बसून काव्य करणारा शेले, आकाशाकडे अंगुली दाखवणारा वृक्ष हे उच्चतम आकांक्षांचे प्रतीक आहे असे मानणारा अर्नोल्ड हे सारे मला वंदनीय आहेत. इंग्लंडचा प्रधान कॅंपबेल वॅनरमॅन याच्याविषयी असे सांगतात, की लंडनमध्ये कॉमन्स सभेचे काम संपल्यावर तो परत स्वगृही स्कॉटलंडला गेला म्हणजे बागेत शांतपणे सहल करी व आपल्या आवडत्या वृक्षासमोर हॅट काढून फिरे. अशा माणसांशी दोन क्षण बोलायला मिळावे असे कोणाला वाटणार नाही ? एका रोमन उमरावाची कथा अशीच हृदयंगम आहे. त्याच्याच बागेत त्याला जाळण्याची शिक्षा जेव्हा त्याला कळली तेव्हा मरणाच्या एक दिवस आधी तो बागेत गेला व चितेसाठी त्याने अशी जागा शोधली, की आपल्या आवडत्या वृक्षांना अग्निज्वालांचा दाह पोचू नये.



वृक्षांच्या सहवासात पुष्कळ दिवस घालवल्यावर असा सुहृद्भाव उत्पन्न होणे अगदी साहजिकच आहे. जरी वृक्षांचे हृद्गत आपल्याला कळले नाही, तरी आपल्या जवळच्या माणसाविषयी जी माया वाटते, तीच त्यांच्याविषयी वाटेल.

आपल्या आयुष्यात जशी जवळची माणसे आनंद व प्रकाश आणतात, तसेच वृक्षसुद्धा सुख देतात. आनंदाच्या क्षणाची आठवण ठेवायची असली तर वृक्षासारखा दुसरा मित्र नाही. वृक्षारोपणाचा समारंभ प्रथम कोणी रूढ केला ते मला माहीत नाही; पण आपण त्याबद्दल त्या अज्ञात व्यक्तीचे ऋण मान्य करायला पाहिजे. जीवनातील संस्मरणीय प्रसंग इतक्या जिवंतपणे साजरे करायला दुसरे साधन कुठे आहे ?

माझी एक इच्छा आहे. गावापासून किंचित दूर, जेथे पुष्कळशी उंच झाडे आहेत, तेथे एक चिमुकले घर बांधावे, त्या वृक्षांच्या सहवासात दिवस काढावेत व अखेर काळ आला म्हणजे एखाद्या गर्द वटवृक्षाच्या छायेत शांत झोपावे.

**प्रश्न :**

अ. खालील प्रश्नांची प्रत्येकी सहा-सात वाक्यांत उत्तरे लिहा.

१. जेथे पुष्कळ वृक्ष असतील तेथे लेखकाच्या मते केव्हा आणि का जावे ?

२. 'वृक्षासारखा सोबती मिळायचा नाही' असे लेखकाने का म्हटले आहे ?

३. वृक्षांच्या रंगरूपांप्रमाणेच लेखकाला वृक्षांच्या आणखी कोणत्या गोष्टी प्रिय आहेत ? का ?

४. वृक्षांच्या बाबतीत सुहृद्भाव असलेल्यांची कोणती वैशिष्ट्ये लेखकाने सांगितली आहेत ?

आ. दोन-तीन वाक्यांत उत्तरे लिहा.

१. हे निसर्गाचे भांडार मला अत्यंत प्रिय आहे, असे लेखकाने म्हटले आहे. ते कोणते ?

२. लेखकाने कोणती इच्छा व्यक्त केली आहे ?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. वृक्षांचे सौंदर्य ज्या वाक्यांतून वर्णिलेले आहे त्यांतील तुम्हांला आवडलेली पाच वाक्ये लिहा आणि ती तुम्हांला का आवडली ते सांगा.

२. हरितवसना, अकल्पित, हृदयंगम, अवर्णनीय, सुहृद्भाव यांचा अर्थ समजून घेऊन त्यांचा वाक्यांत उपयोग करा.

३. वाचा –

अ. जो खांडावया घावो घाली ।
का लावणी जयाने केली ।
दोघा एकचि साऊली ।
वृक्षु दे जैसा ॥ ज्ञाने. १२/१९९९

ब. नाही घर नाही दार
ज्यास नाही रे माऊली ।
अशा अभागी जिवाला
झाड देते रे साऊली ।

व्याकरण :

## तत्पुरुष समास

पुढील वाक्यांतील जाड ठशांत छापलेले सामासिक शब्द पाहा व त्यांतील कोणते पद मुख्य आहे ते सांगा :

(१) माधव मनाचे श्लोक **तोंडपाठ** म्हणतो.
(२) मुले सायंकाळी **क्रीडांगणावर** खेळतात.
(३) **समुद्रकाठी** मीठ तयार होते.
(४) शिवरात्रीला **महादेवाची** यात्रा भरते.
(५) मधूला **पुरणपोळी** फार आवडते.
(६) **नवरात्रात** देवीचा उत्सव असतो.
(७) **शेतकरी** खूप कष्ट करून धान्य पिकवतो.

वरील वाक्यांतील सामासिक शब्दांचा विग्रह पुढील कोष्टकात पाहा :

| क्रम | सामासिक शब्द | पोटशब्द | विग्रह | कोणते पद मुख्य ? |
|---|---|---|---|---|
| १. | तोंडपाठ | तोंड + पाठ | तोंडाने पाठ | दुसरे पद |
| २. | क्रीडांगण | क्रीडा + अंगण | क्रीडेसाठी अंगण | दुसरे पद |
| ३. | समुद्रकाठ | समुद्र + काठ | समुद्राचा काठ | दुसरे पद |
| ४. | महादेव | महा + देव | महान असा देव | दुसरे पद |
| ५. | पुरणपोळी | पुरण + पोळी | पुरण घालून तयार केलेली पोळी | दुसरे पद |
| ६. | नवरात्र | नव + रात्र | नऊ रात्रींचा समूह | दुसरे पद |
| ७. | शेतकरी | शेत + करी | शेत करणारा | दुसरे पद |

वरील सर्व सामासिक शब्दांत दुसरी पदे मुख्य आहेत. **ज्या समासातील दुसरे पद मुख्य असते त्या समासास तत्पुरुष समास म्हणतात.**

या समासाची आणखी काही उदाहरणे :

ईश्वरनिर्मित, विद्यागृह, पोळपाट, ऋणमुक्त, विद्याभ्यास, स्वर्गवास, ग्रंथकार, मनुज, अयोग्य, पीतांबर, बारभाई, मामेभाऊ, डाळवांगे.

**अभ्यास :**

१. पुढील सामासिक शब्दांचे विग्रह करून सांगा.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| आजन्म | पत्रकार | दुःखमुक्त | बिनधोक | वनमाला |
| मतिमंद | दरसाल | यथाविधी | सुयश | दारोदार |

२. पुढे काही सामासिक शब्दांचे विग्रह दिले आहेत त्यांवरून मूळ सामासिक शब्द कोणते ते सांगा.

| | |
|---|---|
| शिस्त नसलेला | कंठापर्यंत |
| संसाररूपी सागर | घरात राहणारा |
| पसंत नसलेला | तीन भुवनांचा समुदाय |
| जल देणारा | वांगे घालून केलेला भात |
| प्रत्येक गल्लीत | प्रत्येक घडीला |





# १२. मातोश्री

**प्रबोधनकार ठाकरे (केशव सीताराम ठाकरे - १८८५-१९७३)**

क्रांतिकारक विचारवंत, साहित्यिक; 'प्रबोधन' या पाक्षिकाचे संस्थापक-संपादक. 'कोदंडाचा टणत्कार' हा वैचारिक ग्रंथ; 'खरा ब्राम्हण' हे नाटक; 'श्री संत गाडगेबाबा', 'रंगो बापूजी' ही चरित्रे आणि 'जुन्या आठवणी', 'माझी जीवनगाथा' हे आत्मचरित्र इत्यादी पुस्तके प्रसिद्ध आहेत.

'मातोश्री' हा उतारा 'माझी जीवनगाथा' या आत्मचरित्रात्मक पुस्तकातून घेतला आहे. या पाठात बालपणीच्या संस्कारातून घडत गेलेल्या लेखकाच्या सामाजिक व्यक्तित्वाचे दर्शन होते.

---

आज आम्ही ज्या सामाजिक, बौद्धिक नि सार्वजनिक पातळीवर आहोत त्याचे सारे श्रेय आमच्या मातोश्रीच्या कर्तबगार नि कडकडीत शिस्तीला आहे. आम्ही तिला 'ताई' म्हणत असू. सारे पनवेल गावही याच नावाने तिला हाक मारत असे. बाबा पत्की या सुखवस्तू वकिलांची ती मुलगी. सासरच्या घराण्याला श्रीमंती नसली, तरी सासू-सासऱ्यांची साधुत्वाची कीर्ती आणि लोकसेवेची पुण्याई धनत्तर. एवढ्या भांडवलावर तिने आत्मोत्कर्षाची निश्चित रूपरेषा मनाशी आखली असावी. तिचा स्वभाव अतिशय मानी होता. खोट्याची, दंभाची, अहंतेची नि कोरड्या फुशारकीची तिला मनस्वी चीड यायची. मग तो कोणी रावरंक का असेना, त्याचा मुलाहिजा ती राखायची नाही.

संसार गरिबीचा होता तरी गरजेसाठी तोंड वेंगाडलेले तिला आवडत नसे. असेल ती मीठभाकरी गोड करून खावी. जेवताना हे बरे नि ते वाईट, असे बोलण्याची घरात कुणालाही मुभा नसे. मागाहून खुशाल चर्चा करावी. अन्न हे परब्रम्ह आहे. जगातल्या साऱ्या उलाढाली त्याच्यासाठीच चाललेल्या असतात. ते मुकाटतोंडी शांतपणाने खात जावे, असा तिचा दंडक असे. माहेरचा संबंध जितक्यास तितकाच ठेवलेला. त्यांचाही उणादुणा शब्द ती ऐकून घ्यायची नाही. लागलेच कडाडून प्रत्युत्तर व्हायचे. घरातील शिस्त सगळ्यांना पाळावी लागत असे. जिथली वस्तू तिथे ठेवलीच पाहिजे. जर इकडची तिकडे झाली, की बिजलीच्या कडकडाटाने सारे घर दणाणून जायचे.

आम्हां मुलांच्या वागणुकीवर आणि अभ्यासावर तिची करडी नजर असे. रात्री आम्ही झोपल्यावर, ती आम्हां सर्व भावंडांच्या पुस्तकांच्या धोपट्या तपासायची. त्यात काही आक्षेपार्ह सापडले, की सकाळी चहाच्या वेळी भरलीच आमची कंबक्ती! अंगरख्याच्या खिशात दिडकी, ढब्बू सापडला तर 'कुठून आणलास ?' या सवालाचे समाधानकारक उत्तर मिळेपर्यंत चहा, जेवण बंद. 'मुलांचे खाण्यापिण्याचे, कपड्यालत्त्याचे लाड. इतर बाबतींतला वाह्यातपणा नि अभ्यासाची हेळसांड मला नाही सहन होणार', असा तिचा जागता दरारा होता. पुस्तकातली छापील चित्रे लाल, निळ्या पेन्सिलने रंगवण्याची पुष्कळ मुलांना सवय असते. ताईला हा छंद खपायचा नाही. 'आज चित्र रंगवले आहेस. एक वेळ माफ करते; पण पुढच्या खेपेला तोंड रंगवीन, याद राखून ठेव' अशी कडकडीत नि खरपूस ताकीद मिळायची.

सायंकाळी शाळा सुटल्यावर दररोज ताईने आणलेली वर्तमानपत्रे आम्हांला मोठ्याने वाचावी लागत. वाचताना शब्दोच्चार कसे होताहेत, मजकुरातील विषयाप्रमाणे आवाजाचे आरोहावरोह ठीक होतात की नाहीत, इकडे तिचे फार बारकाव्याचे लक्ष असायचे. नाटकेही ती वाचून घ्यायची. त्यात एकदा 'विष्कंभक' शब्द आला. तो वाचताना मी भलताच उच्चार करताच डाव्या गालावर थाडकन आवाज झाला. कठीण शब्दांचे अर्थ ती मधून मधून सांगायची. एके दिवशी तिने हरिभाऊंची 'पण लक्षात कोण घेतो' ही कादंबरी आणली. म्हणाली, "दादा, वाच पाहू ही कादंबरी. मी वाचली आहे. फार छान आहे. शिकण्यासारखं पुष्कळ आहे तीत. वाच." सामाजिक प्रश्नांकडे माझे लक्ष वेधण्यास हा प्रसंग कारणीभूत झाला.

दुसऱ्या यत्तेत वजाबाकी, बेरीज शिकायची होती. माझ्या वर्गाला जोशी नावाचे मास्तर होते. त्यांनी आम्हां मुलांना घरून गोट्या विकत घेण्यासाठी दोन-दोन आणे आणायला सांगितले. ताईजवळ पैसे मागितले. कशाला, तेही सांगितले. ती म्हणाली, "बरं, तू जा शाळेत, मी येत्ये पैसे घेऊन." थोड्याच वेळात ती शाळेत आली. ताई शाळेच्या बाजूस येताच हेडमास्तरांसकट सगळ्यांना धाकधूक वाटायची. तसेच काही कारण असल्याशिवाय ती इकडे फिरकायची नाही. हेडमास्तर उपाध्यांनी तिला ओटीवर गाठले. त्यांना पाहताच ताई गरजली —

"काय, उपाध्ये मास्तर, आता काय पोरांना गल्लोगल्ली टब्बू खेळायला शिकवणार आहात वाटतं ?"

उपाध्ये — ''म्हणजे काय ? मी समजलो नाही ताई.''

ताई — ''त्या तुमच्या जोशी मास्तरांनी प्रत्येक मुलाला घरून गोट्यांसाठी दोन-दोन आणे आणायला सांगितलेत, ते कशाला ?''

ताईला बरोबर घेऊन उपाध्ये आमच्या वर्गात आले नि जोशी मास्तरांना खुलासा विचारला. 'वजाबाकी, बेरीज शिकवण्यासाठी' असे ते म्हणताच ताई कडाडली, ''का ? तुमच्या शाळेत रंगीत गोट्यांच्या चौकटींचा दुष्काळ पडला की काय ? पोरांच्या हाताला एकदा गोटी लागली का झालीच त्यांच्या अभ्यासाची गारगोटी.''

उपाध्यांनीही जोशी मास्तरांना समज दिली.

रोज अर्धा तास खरडी (बालबोध आणि मोडी) आणि पंधरा मिनिटांत पुस्ती आम्हांला काढावीच लागे. कागदाला जरा कुठे डाग लागला किंवा एखादे अक्षर कित्त्याप्रमाणे नीटसे आले नाही, की गालगुच्चा चुकायचा नाही. तो चुकला तर कचकावून कानपिळणी ठरलेली. 'ज्याचे हस्ताक्षर खराब त्याची दानत खराब' हे ताईचे पालुपद शंभरदा ऐकावे लागत असे. मराठी गद्य-पद्य विभाग, इतिहास, भूगोल या विषयांत शंभरपैकी सत्तर-पंचाहत्तर मार्क मिळाले तरी ती संतापायची. शंभरच्या शंभर मिळाले पाहिजेत असा तिचा आग्रह. पुढे इंग्रजीच्या बाबतीतही हाच खाक्या. गणित विषयात मात्र आम्ही घोट्या मारूनही कधी पास झालो नाही. आकडे पाहिले की मला आकड्याच यायच्या म्हणा ना.

बय आजीने एकदा गोंडल स्टेटमधल्या सोडतीची, आम्हा चार भावंडांच्या नावांनी चार तिकिटे घेतली. 'केशव सीताराम ठाकरे, पनवेल' नावाच्या वाट्याला अवघे ७५ रुपये आले. मुंबई सरकारातून ते पनवेल मामलेदार कचेरीत बटवड्यासाठी आले. वडिलांनी सही करून ते घेतले. दरमहा पाच त्रिक पंधरा रुपयांच्या पलीकडे ज्याच्या हाताला जादा दमडीचा स्पर्शही होणे नाही, त्या वडिलांच्या हातात एकरकमी पंचाहत्तर रुपये, नि तेही हक्काचे यावे, हा काय लहानसान योगायोग ? पण ताई हा सर्व प्रकार रागीट चेहऱ्याने पाहत, ऐकत होती. घरात आलेल्या लक्ष्मीचा शेजारीपाजारी आबालवृद्धांच्या तोंडून गौरव होत असलेला पाहून ती कडाडली, ''हा लक्ष्मीचा फेरा नाही. अक्काबाईचा फेरा आहे, समजलात ? एक रुपड्याच्या बदली ७५ आले. वरचे ७४ रुपये काय त्या सोडतवाल्यांनी आपल्या पदरचे घातले होय ? इतर ७४ जणांना लुटले नि ही भर केली. ते आता तडफडत असतील. अगदी एक लाखाचे बक्षीस

मिळाले असते, तरी आमच्या घरात नव्याण्णव हजार नऊशे नव्याण्णव लोकांचे तळतळाट आले असते समजलात ! पैशाचा असला मोह काही यशाला जात नसतो. अंगमेहनत करावी, बुद्धी चालवावी नि मिळेल ती चटणीभाकर निर्धास्त खावी. हा कसला जुगाराचा छंद नि त्याचे काय एवढे कौतुक करायचे !''

मुंबईसारख्या मोहमयी शहरात गेली पाऊणशे वर्षे मी राहात आहे; पण ताईच्या या कडकडीत उपदेशानुसार हयातीत एकदाही मी जुगाराच्या कसल्याही फंदात पडलो नाही.

**प्रश्न :**

अ. खालील प्र◌ः नांची प्रत्येकी तीन ते चार वाक्यांत उत्तरे लिहा.

१. ताईच स्वभाव कोणत्या प्रकारचा होता ?
२. मुलां◌ः्या अभ्यासावर ताईची करडी नजर असायची हे कशावरून दिसून येते ?
३. सामाजिक प्रश्नांकडे लेखकाचे लक्ष वेधण्यास कोणता प्रसंग कारणीभूत झाला ?
४. घरात आलेल्या लक्ष्मीचा गौरव होत असताना ताई का संतापल्या ?

आ. खालील विधानांचा अर्थ स्पष्ट करून सांगा.

१. 'सासरच्या घराण्याला श्रीमंती नसली तरी सासू-सासऱ्यांची साधुत्वाची कीर्ती आणि लोकसेवेची पुण्याई धनत्तर.'
२. 'पोरांच्या हाताला एकदा गोटी लागली का झालीच त्यांच्या अभ्यासाची गारगोटी.'
३. 'हा लक्ष्मीचा फेरा नाही. अक्काबाईचा फेरा आहे, समजलात ?'

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. ताईचे शब्दचित्र वीस ते पंचवीस वाक्यांत रेखाटा.
२. खालील शब्दसमूहांचा स्वतःच्या वाक्यांत उपयोग करा.
मुलाहिजा राखणे, तोंड वेंगाडणे, मीठभाकरी गोड करून घेणे, कंबक्ती भरणे, खरडी काढणे.
३. खालील शब्दांचा अर्थ लिहा.
आत्मोत्कर्ष, परब्रम्ह, प्रत्युत्तर, आक्षेपार्ह, आरोहावरोह.
४. 'माझी आई' या विषयावर छोटासा निबंध लिहा.

व्याकरण :

## द्वंद्व समास

पुढील वाक्ये वाचा. त्यांतील जाड ठशांतील सामासिक शब्द पाहा व त्यांतील कोणती पदे मुख्य किंवा प्रधान आहेत ते सांगा :

१. मुलांनी **आईवडिलांची** आज्ञा पाळावी.

२. बाबा **चारपाच** दिवसांत परत येतील.

३. पावसाळ्यात **भाजीपाला** स्वस्त मिळतो.

४. दूरच्या प्रवासास जाताना बरोबर **अंथरूणपांघरूण** घ्यावे.

वरील वाक्यांतील सामासिक शब्दांचा विग्रह कसा करतात ते खालील कोष्टकात पाहा :

| क्रम | सामासिक शब्द | पोटशब्द | विग्रह | कोणते पद मुख्य ? |
|---|---|---|---|---|
| १. | आईवडील | आई + वडील | आई आणि वडील | दोन्ही पदे |
| २. | चारपाच | चार + पाच | चार किंवा पाच | दोन्ही पदे |
| ३. | भाजीपाला | भाजी + पाला | भाजी व पाला वगैरे | दोन्ही पदे |
| ४. | अंथरूण-पांघरूण | अंथरूण + पांघरूण | अंथरूण, पांघरूण व इतर वस्तू | दोन्ही पदे |

वरील सामासिक शब्दांतील दोन्ही पदे मुख्य आहेत.

**ज्या सामासिक शब्दांतील दोन्ही पदे मुख्य असतात त्यांस द्वंद्व समास असे म्हणतात. 'आणि, व, अथवा, किंवा' या उभयान्वयी अव्ययांनी ही दोन्ही पदे जोडलेली असतात.**

तसेच 'भाजीपाला' या शब्दात भाजी व पाला यांशिवाय त्यात मिरची, कोथिंबीर इत्यादी पदार्थांचा समावेश असतो. 'अंथरूणपांघरूण' यात अंथरूण, पांघरूण, उशी, रजई इत्यादींचा समावेश होतो.

द्वंद्व समासाची आणखी काही उदाहरणे :

रामलक्ष्मण, सुखदु:ख, खरेखोटे, विटीदांडू, स्त्रीपुरुष, अहिनकुल, पालापाचोळा, पासनापास, चूकभूल, बरेवाईट, नेआण, बापलेक, मीठभाकर.





# १३. कसरत

दादासाहेब मोरे (दादासाहेब मल्हारी मोरे - जन्म : १९६१)

भटक्या व विमुक्त जमातींच्या उद्धारासाठी झटणारे कार्यकर्ते. 'गबाळ' हे आत्मकथन, 'दुस्काळ' ही कादंबरी आणि 'विमुक्त' हा कथासंग्रह ही त्यांची प्रसिद्ध पुस्तके आहेत.

'कसरत' ही कथा 'विमुक्त' या पुस्तकातून घेतलेली आहे.

या पाठात भटक्या, विमुक्तांच्या जीवनातील विदारक दु:खाचे चित्रण केले आहे.

(१)

सकाळपासून बंड्या आणि त्याची बायको लक्ष्मी आपल्या फाटक्यातुटक्या संसाराची बोचकी डोक्यावर घेऊन, उमश्या व बानी या दोन्ही मुलांना बरोबर घेऊन चालत होती. बंड्यानं फाटक्या लुगड्याच्या कापडात बांधलेलं भलं मोठं गाठोडं डोक्यावर घेतलं होतं. त्या गाठोड्यात जरमनची दोन फुटकी भगुली, तीन-चार काळपट ताटल्या, एक तवा आणि पोटाची आग विझवण्यासाठी काहीतरी वाळल ओलं शिजवून खाता येईल असं उपयोगी पडणार साहित्य होत. त्याच्या उजव्या खांद्याला ढोलगं अडकवलं होतं. त्याच्याबरोबर लक्ष्मी दोन लांब वेळूच्या काठ्या, वर्तुळाकार लोखंडी कडं, अणकुचीदार लोखंडी सळ्या अशा प्रकारचं साहित्य घेऊन चालत होती. दोन फाटकी पोती, सतरा भस्कं पडलेली वाकळ, थोडीफार फाटकी-तुटकी कापडं या सर्वांचं गाठोडं करून तिनं पाठीशी टाकलं होतं. उमश्या मातीची घागर आणि काही लहानसहान साहित्य घेऊन चालत होता. बानी त्यांच्याबरोबर पळत होती. उन्हाचा जोर जसजसा वाढू लागला तसतसं उमश्याला आणि बानीला चालणं जमेना झालं. उन्हामुळं जमीन तापू लागली. त्यांच्या अनवाणी पायाला चटकं बसू लागलं. ऊन चांगलंच वाढलं. त्यांच्या भुकेनं व्याकूळ झालेल्या चेहऱ्यावरून घामाच्या धारा वाहू लागल्या. बानी रडू लागली. रडत रडत ती म्हणत होती, "आय... मला चालाला येत न्हाय... पाय भाजाय लागल्याती..."

लक्षीनं मुलीकडं बघितलं. तिच्या डोक्यावरून हात फिरवत ती म्हणाली, "त्या... तनं गेल्यावर गाव येतंया. तनं गेल्यावर ख्योळ कराचा हाय... तवर चाल."



पाय आपटत उमश्या म्हणाला, ''मला... भूक लागल्याय... आजून केवड... चालाचं हाय... ?''

लक्षी चालता चालता उभी राहिली. तिनं उमश्याला जवळ येऊ दिलं. त्याला बरोबर घेऊन चालत ती त्याची समजूत काढू लागली.

''बाबा... ख्योळ केला म्हंजी... आपणाला भाकर मिळतीया... पयसं मिळत्याती... मग भाकर खायाची... येवडं गाव यीव पातूर चाल... म्हंजी तुला धा पयसं दिती...''

आलेला कंटाळा नाहीसा झाल्यासारखं, उमश्या उत्साहानं म्हणाला, ''मला पयसं... दितीयाच... ? मग चालतू...''

लगेच बानीनं सूर लावला, ''आय... मला... न्हाय पयसं देत... ?''

लक्षी स्वत:शीच हसली. डोक्यावर वेळूच्या काठ्या सरळ करत म्हणाली, ''व्हय... बाय... तुला बी पयसं दिती...''

बंड्या बराच पुढं गेला होता. 'रस्त्यावर एखादं गाव असलं तर तिथं खेळ करावा. लेकरं सकाळपासून उपाशीतापाशी चालायला लागलीत. खेळ केल्याशिवाय त्यांच्या पोटाला काही घालता येणार नाही' या विचारातच तो भराभर चालत होता. त्यानं मागं वळून बघितलं. लक्ष्मी आणि मुलं बरीच लांब राहिली होती. त्यानं डोक्यावरील गाठोडं खाली ठेवलं. तो खाली बसला. लक्ष्मी मुलांना समजावत घेऊन आली. दोन्ही मुलं रडत होती. लक्ष्मी नवऱ्याला म्हणाली, "आवं... लेकरं... भुकेनं हैराण झाल्याती... उनातानाचं चालून पेकाळल्याती... कसं कराचं ?"

"हितनं. मैलबर चाललं म्हजी कुमटं गाव येतंया... ततं जावून ख्योळ करू म्हण. हितं वाटेतच बसून काय कराचं ? पोटाला काय खायाचं ?"

एका हातानं कपाळावरील घाम पुसत लक्ष्मी म्हणाली, "लेकरं भेलकांडाय लागल्याती... माजं सुदीक पाय मेटाकुटीला आल्याती आणिक आशातच कसा ख्योळ कराचा. जीव नगुसा झालाय..."

बंड्या चालता चालता स्वत:शीच बोलल्यासारखा पुटपुटला, "न्हायतर आपल्या पोटाला कोण दील ?"

लक्ष्मी आपल्या विचारातच चालत होती. उमश्या आणि बानी रडत, पाय आपटत आईबापाच्या मागं चालत होती.

दिवस पश्चिमेकडे झुकला होता. उन्हाची तीव्रता थोडी कमी झाली होती. बंड्याचं कुटुंब कुमठे या गावाला आलं. काही माणसं कामावरून, शेतावरून घराकडं येत होती. गावातील भरवस्तीत बंड्याचं कुटुंब आलं. मारुतीच्या देवळासमोरील पटांगणात त्यानं आपला संसार टाकला. लक्ष्मीनं गाठोडी व्यवस्थित ठेवली. दोन्ही मुलं भूक लागली म्हणून रडायला लागली. बंड्या खेळ करण्यासाठी लागणारे साहित्य एकत्र करू लागला. दमलेली मुलं रडत रडतंच गाठोड्याला टेकून झोपी गेली. ढोलगं खांद्याला अडकावीत बंड्या लक्ष्मीला म्हणाला, "त्या पोरास्नी उटीव. तासबर कसातर ख्योळ करू. सांच्याला कुटंतर ऱ्हायाला जागा बगाला पायजी."

झोपलेल्या मुलांना उठवणं लक्ष्मीच्या जिवावर आलं होतं. ती उठली, मुलांच्या जवळ गेली. त्यांच्या तोंडावरून मायेनं हात फिरवत म्हणू लागली, "उटा रं.. ! आपणास्नी ख्योळ कराचा हाय... तुमाला खायाला भाकर नगू का... ? ख्योळ केला म्हंजी झोपा..."

भुकेनं व्याकूळ झालेली मुलं डोळं चोळत उठली. बंड्यानं ढोलगं वाजवण्यास सुरुवात केली. ढोलग्याचा आवाज ऐकून घराघरातील मुलं, "डोंबाऱ्याचा ख्योळ आला" म्हणून पळत येऊ लागली. थकल्या हातानं बंड्या ढोलगं वाजवत होता. ढोलग्यावर थाप मारतच तो म्हणत होता, "ह्ये पळा पळा... ख्योळ आला... कोलांट्या उड्या... काटीवर हुबा ऱ्हायाचं... या या..."

मुलं, बायका, माणसं तिथं गर्दी करू लागली. लक्षी काठ्या, वर्तुळाकार लोखंडी कडं, सळ्या, दगडं असं कसरतीसाठी लागणारं साहित्य व्यवस्थित ठेवत होती. उमश्यानं अंगातील फाटकी अंगराख काढली. बानी आळस देत देत त्याच्याबरोबर उभी राहिली. माणसांची गर्दी वाढत असलेली बघून बंड्याला जास्तच चेव आला. तो मोठ्यानं बडबडत ढोलगं वाजवत होता. बंड्या ढोलगं वाजवत म्हणाला, "आता... ही पोरं... ढोलग्याच्या तालावर कोलांट्या उड्या मारत्याली..."

तो मोठ्यानं बडबडू लागला, "ह्ये चला... चला..."

उमश्या आणि बानी ढोलग्याच्या तालावर उलटसुलट उड्या मारू लागली. दोन्ही पाय वरती करून हातावर चालू लागली. भुकेमुळं, थकव्यामुळं भेलकांडून ती मुलं मध्येच पडत होती. जमलेली माणसं ही एक गंमतच करतात म्हणून मोठमोठ्यानं हसत होती. बंड्याचं अंत:करण तिळतिळ तुटत होतं. लक्षी पडलेल्या मुलांना उचलून परत उड्या मारण्यास, हातावर चालण्यास प्रवृत्त करत होती. माणसं बरीच जमली. लक्षीनं एका गाठोड्यातून चिंध्या काढल्या. त्या गोल लोखंडी कड्याच्या चारही बाजूंनी बांधल्या. त्या बांधलेल्या चिंध्यांवर रॉकेल टाकले. त्या चिंध्या पेटवल्या. गोलाकार लोखंडी कड्याच्या भोवतीनं जाळ झाला. बंड्या जोराजोरानं ढोलगं बडवू लागला. एका काठीला ते जळत असलेलं गोलाकार कडं बांधून, लक्षीनं एका विशिष्ट उंचीवर धरलं. प्रथम उमश्यानं त्या गोल कड्यातून उडी मारली. लक्षीनं त्या कड्याला थोड्या कमी उंचीवर धरलं. त्या वेळी बानीनं त्याच्यातून उडी मारली. जमलेली माणसं आपापसांत कुजबुजत होती,

"च्या मारी... किवडी पोरं हायती. नुसतं फोकावानी लवत्याती. जाळातनं कसा आरपार सूर मारत्याती."

माणसं आश्चर्य व्यक्त करत होती; परंतु बंड्याला मात्र समजून चुकलं होतं, की आता मुलांना काहीच करता येणार नाही. उपाशी पोटी त्यांना धड नीटसं उभं राहता

येत नाही. आपण त्यांना असंच काम करायला लावलं, तर एखादयाचा तोल जाऊन हातपाय मोडेल.

बंड्यानं खांद्याला अडकवलेलं ढोलगं काढून खाली ठेवलं. त्यानं वेळूची उंच काठी घेतली. ती काठी हातात घेऊन तो बघणाऱ्या माणसांनी, मुलांनी केलेल्या गोल रिंगणातून बडबडत फिरू लागला.

"आता ह्या काटीवर... माजी बायकू... येका पायावर हुबी ऱ्हाणार हाय... तुमाला... आमच्या आंगातली कला दाखवतो... पर..."

तो दीनवाणा चेहरा करून, पुढं बोलू लागला, "आमा गरिबाच्या पोटाला... थुडी... थुडी... भाकर आणि कोरड्यास आणून दया... आमच्या आतम्याचा तुमास्नी आशीरवाद लागील... लेकरं सकाळपास्नं उपाशीच हायती..."

लक्षी फार थकली होती. नेहमीसारखं काठीवर उभं राहता येईल की नाही, या विचारानं तिच्या डोक्यात गोंधळ घातला होता. बानी आणि उमश्या दमून गाठोड्याला टेकून बसली होती. बंड्याच्या डोक्यात अनेक शंकांचं काहूर माजलं होतं. तरीपण आपण काहीतरी कला करून दाखवल्याशिवाय आपणाला कोणी भाकरीचा तुकडा देणार नाही. आपल्या मुलांच्या आणि आपल्या पोटाला अन्न मिळणार नाही. शिवाय दोन्ही मुलं थकली आहेत. त्यांच्यानं कसलाच खेळ करणं शक्य नाही. या विचारानं त्यानं तो निर्णय घेतला होता. आपला धीर खचू नये म्हणून तो उमश्याला म्हणाला, "ये त्वा ढोलगं वाजीव..."

पेकाळून गेलेल्या उमश्यानं ढोलगं घेतलं, आणि "ह्ये ह्ये... नवा ख्योळ... नवा ख्योळ" म्हणत वाजवू लागला.

(२)

लक्षीनं फाटकं लुगडं घट्ट आवळून बांधलं. बंड्यानं दोन्ही हातांनी काठी धरली. काठी हालू नये म्हणून सर्व ताकतीने त्याने काठी मजबूत पकडली. उमश्या जोराजोराने ढोलगं वाजवू लागला. लक्षी सरसर काठीवर चढली. माणसं कुतूहलाने त्यांच्याकडं बघू लागली. लहान मुलं त्या गर्दीतून पुढं येण्याची धडपड करू लागली. मोठी माणसं, बायका टाचा उचलून, माना वर करून बघू लागल्या. एका पायावर काठीवर कसं उभा राहता येतंय... हे बघण्याची लोकांची आतुरता वाढत होती.

ती काठीवर चढलेली बघून, जमलेली माणसं म्हणू लागली, "शाब्बास... ! ह्येला म्हंत्याती कला..."

लक्ष्मी काठीवर उभी राहण्याचा प्रयत्न करू लागली; परंतु दिवसभराच्या चालण्याने, अशक्तपणाने तिला नेहमीसारखं उभं राहता येईना. तिची ती अवस्था बघून बंड्याचं अवसानच नाहीसं झालं. काय करावं ते त्याला सुचेना. तो तिला प्रोत्साहन देण्यासाठी काठी घट्ट धरूनच बडबडू लागला, "शाब्बास... मैना... शाब्बास..."



माणसं श्वास रोखून तिच्याकडं बघू लागली. लक्षीनं उजव्या पायाच्या मध्यभागी काठीचं टोक धरलं आणि डावा पाय बाजूला घेऊ लागली. अशक्तपणानं तिला ग्लानी आली होती. त्या ग्लानीतच तिचा तोल एका बाजूला झुकला. ती आठ-नऊ फुटांवरून खाली कोसळली.

बराच वेळ झाला तरी हा माणूस गप्पच बसला आहे, हे बघून एक माणूस बंड्याला म्हणाला, "आरं... ये... डोंबारीबाबा, आसा समादी लागल्यावाणी का बसलायीच... ? ती बाय मरून जाईल... त्या वरच्या गल्लीत... कुंडिबा माळी हाय. त्येला कळतंय. त्यो सुदीवर आणील तिला... आणि हातपाय मोडला अशील तर त्यो बसीवतुया..."

त्याच्या बोलण्यानं बंड्या भानावर आला. बंड्या थरथरत उठला. त्या बोलणाऱ्या माणसाकडं बघत म्हणाला, "मालक... कुटंशी हाय त्येंचं घर ? तिचा हात... मोडलाय... आजून सुदीवर बी यीना..."

त्या माणसानं गावाच्या पश्चिमेला हात केला आणि म्हणाला, "जा घिवून लवकर... न्हायतर मारून टाकचील त्या बिच्चारीला..."

डोळ्यातनं येणारं पाणी पालथ्या हातानं पुसत बंड्या म्हणाला, "जातू... जातू... बरं झालं. तुमी सांगितलं ती. मला तर काय कळीनाच झालंय..." बंड्यानं लक्षीला उचललं. दोन्ही हातांवर आडवं घेतलं. तो वरच्या गल्लीकडं निघाला. बंड्या आपल्या विचारात चालत होता. त्या माणसानं पैसं मागितलं तर काय करायचं ? खेळ मधीच बंद पडल्यामुळे कोणी पाच-दहा पैसंसुद्धा टाकलं नाहीत. भाकरीच्या तुकड्यासाठी आपणाला जिवावर बेतणारी कसरत करावी लागतेय. आज भाकरीचं तुकडंही मिळालं नाहीत.

तो विचारत विचारत कोंडिबा माळ्याच्या घराकडं चालू लागला. एका घरासमोर उभा राहून क्षीण आवाजात म्हणाला, "मावशी... हिकडं... कुंडिबा माळ्याचं घर कुटं हाय ?"

घरातून एक बाई बाहेर आली. ती म्हणाली, "हितनं... तिसरं घर... कुंडिबा मामाचं घर हाय... पर ह्या बायला काय झालंय गा ?"

जड पावलानं पुढं जात बंड्या म्हणाला, "ख्योळ करताना पडल्याया..."

तो कोंडिबाच्या घरासमोर आला. कोंडिबा माळी शेळीसाठी वाकाची दोरी वळत बसला होता. उभा राहूनच बंड्या म्हणाला, "मालक... आमी डोंबाऱ्याचं हाय...



सकाळपास्नं पोटाला आन्न न्हाय... म्हणून ख्योळ कराला गिलू... तर... ही माजी बायकू..."

त्याला पुढं बोलवेना. तो दाटल्या कंठानं तसाच गप्प राहिला. आशेनं कोंडिबाकडं बघू लागला. कोंडिबानं वाकाची दोरी बाजूला ठेवली. गडबडीनं उठून घरात गेला. घरातून एक घोंगडं आणलं. ते घोंगडं पसरत तो म्हणाला, "ह्या बयाला खाली झोपीव... आणिक काय काय झालं ती सांगा..."

बंड्यानं लक्षीला त्या घोंगड्यावर ठेवलं आणि जे घडलं ते सांगण्यास सुरुवात केली. कोंडिबा त्याचं ऐकत ऐकत घरात गेला. त्यानं तांब्याभर पाणी, एक कांदा आणला. तो तिच्या तोंडावर पाणी शिंपडू लागला. कांदा फोडून तिच्या नाकाजवळ धरला. बंड्या भरल्या आवाजानं सांगत होता, "उशीर झाला... ती आजून सुदीवर आली न्हाय. मला भ्या वाटा लागलंय..."

कोंडिबा पाणी शिंपडत म्हणाला, "तिला... काय व्हत न्हाय... तिला लय थकवा

आलाय... त्यातच डोस्कं फुटून रगात गेलंय म्हणून ती बेसुद पडल्याया...''

दोन्ही पोरं एकटक आईच्या चेहऱ्याकडं बघू लागली. लक्षी हळूहळू शुद्धीवर येऊ लागली. ती पापण्या उघडण्याचा प्रयत्न करत होती.

पापण्या उघडल्या, की अंधारी मारत असल्यामुळं ती परत पापण्या मिटत होती. ती शुद्धीवर येत असलेली बघून, बंड्यानं सुटकेचा निःश्वास सोडला. कोंडिबा तिचा कोपरापासून निखळलेला हात बसवू लागला. शुद्धीवर येताच त्या हाताच्या वेदना तिला जाणवू लागल्या. ती तडफडू लागली. तिची तडफड बघणं बंड्याला असह्य झालं. बानी बापाला विचारू लागली,

''बाबा... आय... कसं करा लागल्याय बग...''

कोंडिबा त्या लहान मुलीकडं बघत म्हणाला, ''त्येला काय व्हत न्हाय बाळ... तुजी आय आता बरी झाल्याय...''

त्यानं तिचा हात बसवला. एका कापडानं हात बांधला. लक्षी चांगलीच शुद्धीवर आली होती. ती कसंतरी उठून बसली. दोन्ही मुलं आईला बिलगून बसली. ती मुलांना कवटाळून रडायला लागली. कोंडिबानं एक फडकं घेतलं. त्यानं तिचा हात गळ्यात अडकवला. हाताची हालचाल झाल्यानं तिच्या वेदना वाढत होत्या. कोंडिबा म्हणाला, ''आता काय काळजी करू नगा... ह्येला काय व्हत न्हाय... पर च्यार-पाच दिस ह्या हाताची हालचाल व्हू दिवं नगा...''

भीतभीतच बंड्यानं विचारलं, ''केवडं पयसं दयाचं तुमास्नी ?''

कोंडिबानं त्यांच्यावरून नजर फिरवली. दुःखाने, अगतिकतेने काळवंडलेले चेहरे, त्याच्याकडं आशेनं बघत होते. सवयीनुसार मान हालवत कोंडिबा बोलू लागला, ''तुमी भाकरीच्या तुकड्यापायी जीव धोक्यात घालताया. समद्याम्होरं हात पसरून पाच-धा पयसं गोळा करताया. तुमाकडनं म्या कसं पयसं घ्येवाचं... ?''

बंड्याचं अंतःकरण भरून आलं. त्याच्या डोळ्यांतून टपकन पाणी पडलं. कृतज्ञतेच्या भावनेनं त्याला गहिवरून आलं. भिजलेल्या स्वरात तो म्हणाला, ''देवासारखं... तुम्ही आमाला भेटला... न्हायतर आज माज्या बायकूचं... ह्या लेकरासनीचं काय झालं असतं... ?''

कोंडिबानं उजवा हात उचलला. त्याच्या पाठीवर ठेवत म्हणाला, "ही बग, तुला येळ आली म्हणून त्वा माज्या दारात आलाच. न्हायतर आपुन कवा येक दुसऱ्याला दिसलू सुदीक नसतू. तुज्याकडनं च्यार पयसं घिवून काय माज्या जलमाला पुराचं हायती व्हय ?"

लक्षी आपल्या वेदना विसरून त्याच्याकडं बघतं राहिली. ती म्हणाली, "आजकाल माणसापसलं माणूसपणच न्हायला न्हाय. तुमच्यासारकी माणसं आजून हायती म्हणून तर आमच्यासारक्यांना जगाला येतंया बगा."

थोड्या वेळानं बंड्याकडं बघून कोंडिबानं विचारलं, "कुटं न्हालाया... ?"

त्याबरोबर बंड्याला आपल्या साहित्याची आठवण झाली. तो गडबडीनं उठत म्हणाला, "आमचं समदं सामान ख्योळ करत्याल्या जागीच पडलंया. आमी निगतू..."

त्यानं कोंडिबाचा निरोप घेतला.

लक्षीला धरून तो खेळ केलेल्या जागेकडे येऊ लागला. तो मुलांना म्हणाला, "तुमी दोगंजण पळत म्होरं जावा..."

लक्षी थकल्या स्वरात म्हणाली, "समदं उगड्यावर इस्काटून पडलं व्हुतं. काय झालंया कुणाला ठावं ?"

दोन्ही मुलं पळत पुढं गेली. बंड्या लक्षीला धरून गडबडीनं चालू लागला. तो खेळ करत असलेल्या जागेच्या जवळ आला. त्यानं समोर बघितलं, उमश्या आणि बानी इकडं तिकडं शोधत होती. त्याच्या संसारातील निम्मं-अर्धं साहित्य नाहीसं झालं होतं. ते दोघं; मुलांनी गोळा केलेल्या निम्म्याअर्ध्या संसाराकडं आणि मोडलेल्या हाताकडं पाहात राहिले.

**प्रश्न :**

अ. खालील प्रश्नांची उत्तरे थोडक्यात लिहा.

१. बंड्याच्या संसारात कोणकोणत्या वस्तू होत्या ?

२. ढोलक्याच्या तालावर कोणते खेळ चालू झाले ?

३. लक्षी काठीवरून खाली का कोसळली ?
४. लक्षीला शुद्धीवर आणण्यासाठी कोंडिबाने काय काय केले ?
५. बंड्याने कोंडिबाचा गडबडीने निरोप का घेतला ?

आ. खालील वाक्यांचे संदर्भासहित स्पष्टीकरण करा.
१. ''न्हायतर आपल्या पोटाला कोण दील ?''
२. ''किवडी पोरं हायती, नुसतं फोकावानी लवत्याती.''
३. ''तुमच्यासारकी माणसं आजून हायती म्हणून तर आमच्यासारक्यांना जगाला येतंया बगा.''

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. खालील शब्दांबद्दल प्रमाण भाषेतील शब्द लिहा.
भगुली, ततं, पयसं, माजं, सुदीक, कोरड्यास, तुमास्नी, बेसुद, समद्या, म्होरं.
२. भेलकांडाय लागल्याती, जीव नगुसा झालाय अशा प्रकारची बोलीभाषेतील पाठातील वाक्ये शोधून लिहा व त्यांचा अर्थ प्रमाणभाषेत लिहा.
३. तुम्ही पाहिलेल्या डोंबाऱ्याच्या खेळाचे वर्णन १५-२० वाक्यांत लिहा.
४. बंड्या डोंबारी आपली हकीकत तुम्हांस सांगत आहे, अशी कल्पना करून संवाद लिहा.
५. 'कसरत' हा पाठ वाचल्यावर तुमच्या मनात कोणते विचार येतात ते १०-१२ वाक्यांत लिहा.
६. 'कसरत' या पाठातील कोणता प्रसंग वाचताना तुम्हांला दुःख होते ? का ?
७. आपल्या दैनंदिन वापरातील कांद्याचे काही औषधी उपयोग दिले आहेत, ते वाचा व आपल्या वापरातील लवंग, आले, लसूण, पुदिना, हळद, कडीपत्ता, मेथी, जिरे इत्यादींचे औषधी उपयोग माहीत करून घ्या. जसे - कांदा.
अ) झटके येताच पांढरा कांदा फटदिशी फोडून चटदिशी हुंगायला देतात.
ब) अंगावर पित्त उठल्यास कांद्याचा रस चोळतात.
क) दाढ दुखत असल्यास कांद्याचे बी दाढेत धरतात.
ड) मुलांना जुलाब होऊ लागल्यास कांद्याचा रस १ ते २ वेळा पाजतात.
इ) विंचू चावल्यास कांद्याचा रस काढून त्या ठिकाणी चोळतात.
ई) कावीळ झाल्यास पांढरा कांदा व जुना गूळ, हळद घालून रात्री झोपताना खायला देतात (सात दिवस).

व्याकरण : **बहुव्रीही समास**

खालील वाक्ये वाचा. त्यांतील जाड ठशांतील सामासिक शब्द पाहा. त्यांचे विग्रह कसे करतात ते खालील कोष्टकात दिले आहे. त्यावरून त्यांतील कोणती पदे मुख्य आहेत ते पाहा.

(१) ठेविले **अनंते** तैसेचि राहावे.

(२) **गजाननाला** विद्येची देवता मानतात.

(३) शंकराला **नीलकंठ** असे नाव आहे.

(४) **कमलनयन** रामाला पाहून मला आनंद झाला.

(५) उद्योगी मनुष्य क्वचित **निर्धन** असतो.

| क्रम | सामासिक शब्द | पोटशब्द | विग्रह | कोणते पद मुख्य ? |
|---|---|---|---|---|
| १. | अनंत | अन् + अंत | नाही अंत ज्याला तो (परमेश्वर) | दोन्ही पदांना महत्त्व नसून त्यांवरून तिसऱ्याच गोष्टीचा बोध होतो. |
| २. | गजानन | गज + आनन | गजाचे आहे आनन ज्याला तो (गणेश) | |
| ३. | नीलकंठ | नील + कंठ | नील आहे कंठ ज्याचा तो (शंकर) | |
| ४. | कमलनयन | कमल + नयन | कमळासारखे नयन ज्याचे आहेत तो (राम) | |
| ५. | निर्धन | निः + धन | निर्गत (गेलेले) आहे धन ज्याच्यापासून तो (दरिद्री) | |

वरील उदाहरणांवरून काय आढळून येते ?

(१) या सामासिक शब्दांतील दोन्ही पदे महत्त्वाची नसतात.

(२) या दोन्ही पदांवरून तिसऱ्याच पदाचा बोध होतो.

(३) हा सामासिक शब्द या निराळ्या पदाचे विशेषण असतो.

यावरून असे लक्षात येईल, की **ज्या सामासिक शब्दातील दोन्ही पदे प्रधान नसून त्या सामासिक शब्दात असणाऱ्या पदांशिवाय निराळ्याच पदाचा बोध होतो, त्या समासाला 'बहुव्रीही' समास असे म्हणतात.**

या समासाची आणखी काही उदाहरणे :

लंबोदर, लक्ष्मीकांत, जितेंद्रिय, चौकोन, चक्रपाणि, चतुर्भुज, अनाथ, अकर्मक, पद्मनाभ, भक्तप्रिय, सत्यव्रत, भीमादी.

**अभ्यास :**

१. पुढील सामासिक शब्दांचे विग्रह करून समास ओळखा :

| | | | |
|---|---|---|---|
| देवदानव | गंधफुले | गरुडवाहन | निर्बल |
| तपोधन | भालचंद्र | इंद्रादी | पानपत्रावळ |
| जरामरण | न्यायान्याय | हळदकुंकू | गलितपर्ण |
| घडोघडी | गुणहीन | लंगोटीमित्र | मेंढवाडा |

२. पुढे काही सामासिक शब्दांचे विग्रह दिले आहेत. त्यावरून मूळ सामासिक शब्द व समास प्रकार कोणता ते सांगा :

| | |
|---|---|
| दहा किंवा पाच | भाजी, भाकरी व त्याच प्रकारच्या वस्तू |
| पाच आहेत मुखे ज्याला तो | बरे किंवा वाईट |
| पान, सुपारी व इतर पदार्थ | लहान किंवा त्याच प्रकारचा |
| नाही जे पसंत ते | अष्ट आहेत भुजा जिला ती |
| ज्याला आदी नाही असा | पद्म आहे नाभीवर ज्याच्या तो |
| नातीचा नवरा या नात्याने जावई | साखरेसारखे लिंबू |





# १४. वीर वामनराव जोशी

**विद्याधर गोखले (विद्याधर संभाजीराव गोखले - १९२४-१९९६)**

मराठीतील प्रसिद्ध पत्रकार, नाटककार. 'गज़लसम्राट गालिब', 'मर्दानी झाशीवाली' ही चरित्रे; 'जावयाचे बंड', 'चमकला ध्रुवाचा तारा', 'मेघमल्हार', 'मंदारमाला', 'स्वरसम्राज्ञी', 'सुवर्णतुला' इत्यादी अनेक नाटके त्यांनी लिहिली आहेत.

हा पाठ 'सौरभ' या पुस्तकातून घेतला आहे.

या पाठात देशासाठी त्यागमय जीवनाचे आदर्श बनलेल्या वामनराव जोशी यांचा परिचय करून दिला आहे.

---

अनेक वर्षे अस्मानी-सुलतानी संकटांना निधड्या छातीने तोंड देत एखादा बळकट दुर्ग उभा असावा, अनेकांचे स्फूर्तिस्थान बनावा, एखाद्या पवित्र तीर्थस्थानाप्रमाणे वंदनीय व्हावा आणि मग एकाएकी निसर्गक्रमानुसार तोही ढासळून कालवश व्हावा; त्याप्रमाणेच विदर्भाचे भीष्म पितामह वामनराव जोशी मृत्यू पावताच झाले !

दादांचे मूळ घराणे रत्नागिरी जिल्ह्यातील बसणी या गावचे; परंतु त्यांचा जन्म विदर्भातील अमरावती शहरात १८८१ साली झाला. त्यांचे बालपण, शिक्षण व देदीप्यमान कर्तृत्व वऱ्हाडातच झाले. विदर्भ हीच त्यांची जन्मभूमी, कर्मभूमी व निर्वाणभूमी !

१८९९ साली दादा मॅट्रिकची परीक्षा पास झाले. गरिबीमुळे ते पुढचे शिक्षण घेऊ शकले नाहीत. चुलत्यांना मदत करण्यासाठी त्यांनी दुष्काळ फंडाची सरकारी नोकरी धरली; पण १९०२ साली बाणेदार स्वभावाच्या दादांचा वरिष्ठ अधिकाऱ्यांशी खटका उडाला व त्यांनी सरकारी नोकरीवर लाथ मारली.

स्वातंत्र्ययुद्धाची वैदर्भीय आघाडी सांभाळत असता कुटुंब जगवण्यास आवश्यक तेवढाच पैसा ते मिळवत. कित्येकदा त्यांना दुपारची भ्रांत पडत असे; पण विशाल राष्ट्र-संसाराची प्रथम काळजी वाहणाऱ्या या पुरुषसिंहाने स्वतःच्या चिमुकल्या संसाराचा मोह कधीच धरला नाही. प्रथम 'जनता जनार्दनाची सेवा व नंतर कुटुंबाची' हे ब्रीद ते पाळत होते.

१९२४ सालची गोष्ट. दादांच्या मार्गदर्शनाखाली सुरू झालेले 'स्वतंत्र हिंदुस्थान' साप्ताहिक दादांनी मालकी हक्कांसह चालवण्यास घेतले होते. त्या सुमारास त्यांचा वडील मुलगा नारायण हा केवळ प्रपंचातच नव्हे, तर साप्ताहिकाच्या कामातही खूप मदत करत असे. पण हा नारायण एकदा खूप आजारी पडला. असे म्हणतात, की 'नारायण अर्ध्या-पाऊण तासाचा सोबती आहे' असे सांगून डॉक्टर निघून गेले, तरी कर्तव्यदक्ष दादा मुलाच्या उशाशी बसून 'स्वतंत्र हिंदुस्थान' चा अग्रलेख पुरा करत होते. नारायणाने क्षीण आवाजात विचारले, "दादा, डॉक्टरांचे मत काय पडले?" दादांनी सांगितले, "नारायण, तुझ्यासंबंधीचे डॉक्टरांचे मत आशा-निराशेमध्ये हेलकावे खात आहे." तेव्हा तो वीरपुत्र उद्गारला, "तर मग मला मरणाला सिद्ध झालेच पाहिजे. मला मरणाचे भय वाटत नाही, कारण ते अटळच असते. वाईट वाटते ते अशासाठी,की आपली सेवा मला करता येणार नाही. हे माझे शेवटचे बोल आपण बॅरिस्टर सावरकरांच्या कानावर घाला." आणि थोड्याच वेळानंतर त्याने दादांच्या मांडीवर प्राण सोडला. संकटाच्या वेळीही हसतमुख असणाऱ्या स्थितप्रज्ञ दादांच्या नेत्रांत त्या वीरपुत्राच्या मरणाने दोन अश्रुबिंदू चमकले; पण तेही क्षणभरच ! नारायणच्या उत्तरक्रियेलाही पुरेसे पैसे दादांजवळ नव्हते, असे म्हणतात.

एका बाजूने आपण होऊन स्वीकारलेल्या अठराविश्वे दारिद्र्याने व दुसऱ्या बाजूने अस्मानी रोषाने वामनरावांची व त्यांच्या कुटुंबाची जणू काही सत्त्वपरीक्षाच चालवली होती. ऐन उमेदीच्या काळातच, त्यांचे कर्तेसवरते तीनही सख्खे व चुलतभाऊ काळाने ओढून नेले. कर्तृत्ववान नारायणाच्या पाठोपाठ, धाकटा मुलगा हरीही कालवश झाला. संकटाचे एवढे दारुण प्रहार लागोपाठ होत असताही प्रचंड वादळात व मुसळधार पावसात शांत चित्ताने उभ्या असलेल्या धीरगंभीर गिरिराजाप्रमाणे वीर वामनराव अचल राहिले. त्यांनी त्यागनिष्ठ देशसेवेचे असिधाराव्रत क्षणभरही सोडले नाही.

कांचनाला मृत्तिकेसमान लेखणाऱ्या दादांच्या त्यागशील वृत्तीचे एक उदाहरण त्यांच्या मृत्यूपूर्वीच घडले. भारत सरकारने कृतज्ञतेने देऊ केलेली चार हजार रुपयांची देणगी त्यांनी स्वीकारली नाही; पण त्यांच्या जीवनातील अशा प्रकारचे हे पहिलेच उदाहरण नव्हे. यापूर्वीही अनेकदा त्यांनी ही निःस्पृह त्यागनिष्ठा दुपारची भ्रांत असतानाही दाखवली होती हे विशेष.

१९१४-१५ सालची गोष्ट असेल. वीर वामनरावांच्या 'राक्षसी महत्त्वाकांक्षा' नाटकाने ललित कलादर्श मंडळीला अपेक्षेबाहेर यश मिळवून दिले होते. याची जाणीव

ठेवून केशवराव भोसले यांनी वामनरावांकडे ठरलेल्या रकमेहून चारशे रुपये अधिक पाठवून दिले. पण 'ठरलेल्या रकमेहून मला स्वत:ला काहीही जास्त नको', असे म्हणून दारिद्र्यातही कर्णाचा दिलदारपणा बाळगणाऱ्या वामनरावांनी त्यातील काही रुपये केशवरावांना परत केले व काही पुण्याच्या अनाथ बालिकाश्रमाला दिले.

दादांच्या त्यागी वृत्तीची अशीच एक आठवण त्यांचे जीवश्चकंठश्च मित्र गुलाबराव बक्षी सांगत असत. त्याचे असे झाले, की रणदुंदुभी नाटकाचे कानडीमध्ये रूपांतर करून, एका कंपनीने दक्षिणेत बराच पैसा मिळवला. तेव्हा त्या दाक्षिणात्य नाटक कंपनीने कृतज्ञतेने एक हजार रुपयांचा चेक दादांकडे पाठवला. ज्या दिवशी हा चेक आला, त्याच दिवशी गोव्याच्या राष्ट्रीय शाळेचे शिक्षक ऱ्हाडातून काही मदत मिळवण्यासाठी वामनरावांकडे आलेले होते. झाले "योगायोग तर उत्तम जमला," दादा हसत म्हणाले, "नाहीतरी हे पैसे मजकडे अनपेक्षितपणेच आलेले आहेत. तुम्हांस सध्या पैशाची फार गरज आहे. तेव्हा हा चेक तुमच्या राष्ट्रीय शाळेस मी देऊन टाकतो!" आणि त्यांनी 'राष्ट्राय इदं न मम' या बाण्याने तो पैसा त्या राष्ट्रकार्यास वाटून टाकला.

सहकाऱ्यांची निरलसपणे सेवा-शुश्रूषा करून, आपल्या भाकरीतील अर्धी भाकरी त्यांना प्रेमाने देऊन त्यांनी विदर्भातील तरुणांची संघटना भरभक्कम केली. दादासाहेब खापर्डे व लोकमान्य टिळक यांच्या गुणग्राही दृष्टीने वामनरावांची तेव्हाच पारख केली. टिळकांनी वामनरावांच्या तेजस्वी लेखणीमुळे 'राष्ट्रमत' मध्ये लेखन करण्याचे काम विश्वासाने सोपवले होते. त्यांचे अक्षर मोत्यासारखे गोल व सुंदर होते, म्हणूनच लोकमान्यांसारख्या व्यासमहर्षीचे 'गीतारहस्य' लिहून काढण्याचे कामही त्यांच्याकडे आले.

१९०८ साली त्यांच्यावर राजद्रोहाचा खटला होऊन जामिनावर त्यांची सुटका झाली. त्यानंतर गांधीयुगात १९२१ साली त्यांच्यावर राजद्रोहाचा दुसरा खटला झाला व दीड वर्षाची शिक्षा झाली. १९२३ साली पुनश्च राजद्रोहाबद्दल अटक होऊन दीड वर्ष सश्रम कारावासाची शिक्षा झाली. याच वेळी अमरावतीपासून सहा मैलांवर असलेल्या बलगाव या ठिकाणी प्रचंड सभा भरून, तीत जनतेने त्यांना 'वीर' ही पदवी बहाल केली. त्यानंतर १९३० च्या असहकाराच्या चळवळीत त्यांनी दोन वर्षांचा खडतर तुरुंगवास सोसला. नंतर १९४२ च्या स्वातंत्र्य-संग्रामातही त्यांनी कारावास भोगला.

अशा प्रकारे प्रत्येक चळवळीत ते विदर्भाचे सेनापती म्हणून अग्रभागी चमकत होते.

स्वातंत्र्याच्या प्रत्येक आंदोलनाच्या वेळी दादांचे वीर वक्तृत्व विदर्भाच्या खेड्यापाड्यात दुमदुमत असे. चळवळ यशस्वी करण्यासाठी तहानभूक विसरून दिवसरात्र अविश्रांत झटणारा दादांसारखा सेनापती विदर्भाला लाभला, हे त्याचे भाग्य होय ! स्वातंत्र्य-संग्रामात काय अथवा निवडणूक युद्धात काय, दादा इतके गुरफटून गेलेले असत, की दोन-दोन, तीन-तीन दिवस त्यांना अंघोळीलाही फुरसत मिळत नसे. खरोखरच, 'देशकार्यी लागली टाळी। तेथे देहाते कोण संभाळी ।' अशीच दादांच्या देशभक्तीची उत्कटता होती.

दादा थोर देशभक्त होते, झुंजार पुढारी होते, कुशल संघटक होते, त्याचप्रमाणे ते महाराष्ट्राचे एक नामांकित वक्तेही होते. वामनरावांचा मुक्काम पुण्यात असताना, केशवराव छापखाने यांचे व्याख्यान ऐकण्यासाठी ते किर्लोस्कर थिएटरात गेले होते. गर्दी अलोट होती; पण वक्ते ऐनवेळी येऊ शकले नाहीत. तेव्हा सभेचे चालक बुचकळ्यात पडले; परंतु गुणज्ञ संयोजकांनी वामनराव दादांना ऐनवेळी व्याख्यान देण्याची विनंती केली. भव्य फेटा बांधलेली वामनरावांची धिप्पाड देहयष्टी व्यासपीठावर दिसताच, 'हे कोण क्हाडी मल्ल आले आहेत ?' या भावनेने क्षणमात्र त्यांची टिंगलही काही श्रोत्यांनी केली; पण एखादया खोल दरीतून निघालेल्या सिंहगर्जनेप्रमाणे वामनरावांचे ओजस्वी वक्तृत्व सुरू होताच श्रोतृवृंद चित्रासारखा तटस्थ झाला !

वीर वामनरावांचे पहाडी वक्तृत्व हे एक भूषणच होऊन बसले होते. जसे वामनरावांचे वक्तृत्व तसेच त्यांचे लिखाण. शुद्ध, जोरकस मराठी भाषा, विवेचनाची सुस्पष्टता, ध्येयनिष्ठ निर्भीडता व ज्वलंत वीररस हे त्यांच्या वक्तृत्वाचे गुण त्यातही आढळतील.

मराठी साहित्याचा इतिहास लिहिताना नामवंत नाटककारांच्या मालिकेतही वीर वामनरावांना मानाचे स्थान दयावे लागेल. वीररसप्रधानता हे वामनरावांच्या नाटकाचे एक वैशिष्ट्य आणि दुसरे त्यांच्या पदांतील प्रसाद ! देवलांचा अपवाद सोडल्यास वीर वामनरावांइतकी सुहज, सफाईदार, प्रासादिक नि तरीही रागदारीस अनुकूल अशी पदे लिहिणारे नाटककार विरळच !

**प्रश्न :**

अ. खालील प्रश्नांची प्रत्येकी आठ ते नऊ वाक्यांत उत्तरे लिहा.

१. राष्ट्रकार्यासाठी उदारपणा दाखवणारे कोणकोणते प्रसंग पाठात आले आहेत ?

२. दादांना विदर्भाचे सेनापती असे का म्हटले आहे ?

३. पाठात आलेली दादांची वैशिष्ट्ये कोणती ?

४. दादांच्या ठायी ओजस्वी वक्तृत्व होते हे कोणत्या प्रसंगावरून दिसून येते ?

आ. खालील प्रश्नांची प्रत्येकी दोन ते तीन वाक्यांत उत्तरे लिहा.

१. स्वतःच्या चिमुकल्या संसाराचा मोह दादांनी कधीच धरला नाही, असे का म्हटले आहे ?

२. दादांची देशभक्ती कोणत्या दोन काव्यपंक्तींत वर्णिलेली आहे ?

३. दादांच्या लेखनाची वैशिष्ट्ये कोणती ?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. खालील वाक्यांतील भाषासौंदर्य समजावून घ्या.

अ. धीरगंभीर गिरिराजाप्रमाणे वीर वामनराव अचल राहिले.

ब. 'राष्ट्राय इदं न मम'

२. तुमच्या माहितीतील एका देशभक्ताचे कार्य १२-१५ ओळींत लिहा.

**व्याकरण :**

## व्याकरण चालवणे

आतापर्यंत आपण शब्दांच्या सर्व जातीची ओळख करून घेतली. नाम, सर्वनाम विशेषण, क्रियापद, क्रियाविशेषण, शब्दयोगी, उभयान्वयी व केवलप्रयोगी या शब्दांच्या आठ जाती आहेत. त्यांच्या पोटजातींचीही ओळख आपण आतापर्यंत करून घेतली. वाक्य कशास म्हणतात हे शिकलो. वाक्य हे शब्दांचे बनलेले असते. वाक्यात येणाऱ्या शब्दांचा एकमेकांशी काही संबंध असतो हेही आपण शिकलो.

आता एखादे वाक्य तुम्हांला दिले, की त्यातील प्रत्येक शब्दाची व्याकरणातील जात व पोटजात तुम्हांला सांगता येईल. जर तो शब्द नाम किंवा सर्वनाम असेल तर त्याला होणारे विकार म्हणजे लिंग, वचन, पुरुष, विभक्ती या गोष्टी तुम्हांला सांगता येतील. जर एखादा शब्द क्रियापद असेल तर त्याचा काळ, अर्थ व प्रयोग कोणता हेही सांगता येईल.

अशा रीतीने **वाक्यात वापरलेल्या शब्दासंबंधी व्याकरणविषयक संपूर्ण माहिती सांगणे यालाच शब्दाचे 'व्याकरण चालवणे' असे म्हणतात.** याला **'पदपरिस्फोट'** असेही नाव आहे.

शब्दाचे व्याकरण चालवताना कोणत्या जातीच्या शब्दाबद्दल कोणकोणती माहिती द्यावी लागते ती पुढे तक्त्याच्या स्वरूपात दिली आहे. तिचा नीट अभ्यास करा.

| क्रम | शब्दाची जात | कोणकोणती माहिती द्यावी लागते ? |
|---|---|---|
| १. | नाम | मूळ शब्द, प्रकार, लिंग, वचन, विभक्ती व वाक्यातील संबंध |
| २. | सर्वनाम | |
| ३. | विशेषण | मूळ शब्द, प्रकार, विशेष्य |
| ४. | क्रियापद | मूळ धातू, प्रकार, काळ, अर्थ, लिंग, पुरुष, वचन व प्रयोग |
| ५. | क्रियाविशेषण | अव्ययाचा प्रकार व त्याचे कार्य |
| ६. | शब्दयोगी | |
| ७. | उभयान्वयी | |
| ८. | केवलप्रयोगी | |

**शाबास ! तुमच्या संघाने अंतिम सामना आज जिंकला व ढालही मिळवली.**

**शाबास** — प्रशंसादर्शक केवलप्रयोगी अव्यय.

**तुमच्या** — मूळ शब्द 'तुम्ही', द्वितीय पुरुषवाचक सर्वनाम, उभयलिंगी, षष्ठीचे अनेकवचन. या वाक्यात 'तुमच्या' हे सार्वनामिक विशेषण, 'संघाने' या विशेष्याकडे संबंध.

**संघाने** — मूळ शब्द 'संघ', सामान्यनाम, पुल्लिंगी, तृतीयेचे एकवचन. 'जिंकला' या क्रियापदाचा कर्ता.

**अंतिम** — 'सामना' या नामाचे गुण विशेषण.

**सामना** — सामान्यनाम, पुल्लिंगी, प्रथमेचे एकवचन. 'जिंकला' या क्रियापदाचे कर्म.

**आज** — कालवाचक क्रियाविशेषण अव्यय.

**जिंकला** — मूळ धातू 'जिंक', सकर्मक, स्वार्थी, भूतकाळी, पुल्लिंगी, तृतीय पुरुषाचे एकवचन. या वाक्यात 'संघाने' हा कर्ता, 'सामना' हे कर्म, 'जिंकला' हे क्रियापद. हा कर्मणिप्रयोग.

**व** — प्रधानत्वसूचक उभयान्वयी अव्यय. दोन वाक्यांना जोडण्याचे कार्य करते.

**ढालही** — मूळ शब्द 'ढाल', सामान्यनाम, स्त्रीलिंगी, प्रथमेचे एकवचन. 'मिळवली' या क्रियापदाचे कर्म.

**ही** — शुद्ध शब्दयोगी अव्यय. 'ढाल' या नामाला जोडून आले आहे.

**मिळवली** — मूळ धातू 'मिळ', सकर्मक, प्रयोजक, भूतकाळी, स्वार्थी, स्त्रीलिंगी, तृतीय पुरुषाचे एकवचन. या वाक्यात 'संघाने' हा अध्याहृत कर्ता, 'ढाल' हे कर्म व 'मिळवली' हे क्रियापद. हा कर्मणिप्रयोग.

**अभ्यास :**

१. पुढील वाक्यांतील ठळक अक्षरांतील शब्दांचे व्याकरण चालवा :

(१) **तो** ससा पाहून **चंद्राला** गंमत वाटली.

(२) **पावसाळ्यात** आभाळात **ढगांचा** पिसारा फुलतो.

(३) बिचारा **ससा सैरावैरा पळत** होता.

(४) **जलवंतीने गाईच्या** गळ्यास **मिठी** मारली.

(५) इतक्यात **भयंकर** गडगडाट झाला व पाऊस **पडू** लागला.

(६) **दोन** दिवसांपूर्वी **मी** सचिवालय **पाहिले.**

(७) आपल्या देशात पूर्वी **घनदाट** अरण्ये **होती.**

(८) **अहाहा ! किती** रम्य देखावा आहे **हा !**

(९) **छे !** मी **त्याला** भेटलोदेखील नाही.





# १५. पाड्यावरचा चहा

**गोदावरी परुळेकर : (गोदावरी शामराव परुळेकर - १९०८-१९९६)**

सामाजिक कार्यकर्त्या, ठाणे जिल्ह्यातील आदिवासी भागात कार्य. 'जेव्हा माणूस जागा होतो' हे आदिवासींच्या जीवनसंघर्षाची माहिती देणारे पुस्तक प्रसिद्ध. आदिवासींसाठी केलेल्या कार्याबद्दल त्यांना १९८४ चे 'सोव्हिएट लँड नेहरू पारितोषिक' देण्यात आले.

हा पाठ 'जेव्हा माणूस जागा होतो' या पुस्तकातून घेतला आहे.

अर्धपोटी, अर्धनग्न अवस्थेत जीवन जगणाऱ्या वारल्यांना पाहुण्यांसाठी 'चहा' करण्याकरता किती खटपटी कराव्या लागल्या याची हकीगत या पाठात सांगितली आहे.

---

सात-आठ किंवा दहा-पंधरा खोपट्यांचा समूह ज्या ठिकाणी असेल त्याला पाडा म्हणतात. असे पाच-सात अगर जास्तीत जास्त दहा, क्वचित पंधरा पाडे मिळून एक गाव होतो. एक पाडा दुसऱ्या पाड्यापासून अर्धा मैल, मैल, काही ठिकाणी दोन-तीन मैल अंतरावर वसलेला असतो. एका गावातल्या साऱ्या पाड्यांना भेट द्यायची म्हणजे पाच-सहा मैलांचा फेरफटका करावा लागतो. साधारण उंचवट्यावर झाडांचा आश्रय घेऊन सावलीला हे पाडे वसलेले आहेत.

अशा एका 'सालकर पाडा' नावाच्या पाड्यावर आम्ही गेलो. तेथे कारव्यांच्या किंवा बांबूच्या काठ्यांच्या भिंती करून त्या शेणामातीने सारवून तयार केलेली खोपटी आमच्या स्वागतासाठी हजर होती. वारल्यांच्या घरांना लाकूड फार कमी वापरतात. मेढी, चौकटीची लाकडे व इतर चार-सहा वासे. काही खोपटांना एवढेही लाकूड नसते. काही खोपटे इतकी ठेंगणी असतात, की आत जायचे म्हटले, तरी वाकून जावं लागते. आमचा एक कार्यकर्ता लक्ष्मण सापट याचे घर असेच होते. मला नेहमी अगदी जपून आतबाहेर करावे लागे. बहुतेक घरे एकदालनीच आहेत. एकच दार. कुठल्याही कारव्या अगर कामट्या मोडल्या की खिडकी तयार ! पावसापासून संरक्षण म्हणून काही घरांवर पेंढा, तर काहींवर पळसाची पाने घालतात. कौलारू घरे क्वचितच दिसत असत. वारल्यांच्या घरांत रक्षण करण्याची गरज भासावी असे काहीच नसल्यामुळे



ढकलली तर कोसळून पडतील अशीच ती खोपटी होती. खोपट्याच्या भोवताली सुमारे सहा ते नऊ इंच उंचीचा, कडेला दगड लावून केलेला, सारवलेलां ओटा असे. आम्ही एका ओट्यावर जाऊन बसलो. प्रत्येक खोपट्याच्या पुढे बांबू व कामट्यांची लहान टेबलासारखी माची केली होती. त्यावर पिण्याच्या पाण्याची मडकी होती. खोपट्याच्या बाहेर लहानलहान खड्डे करून त्यांत कोंबड्यांसाठी पाणी ओतून ठेवले होते.

आम्ही काही वेळ बसलो तरी माणसांची चाहूल कोठेच कळेना. कोणी दिसेना. आम्ही तेथे कशाला गेलो होतो, आम्हांला काय हवे होते, ते विचारायलासुद्‌धा कोणी येईना. पाखरांचा चिवचिवाट व कोंबड्यांचा फडफडाट सोडला, तर सारा शुकशुकाट होता. थोड्या वेळाने आम्ही उठून आजूबाजूला फिरू लागलो. एका ठिकाणी केविलवाणी दिसणारी मुले बसलेली होती. त्यांना सांभाळण्यासाठी घरी राहिलेली एक-दोन मुले तेथेच शेजारी उभी होती. मुलांच्यामुळे व कुत्र्यांच्या भुंकण्यामुळे तेथे मनुष्यवस्तीचा भास होत होता.

मी काही खोपट्यांत गेले. तेथे काय दृश्य दिसले ? एका बाजूला तीन दगडांची चूल. चुलीत व बाहेर ढीगभर राख ! सतत चुलीवर ठेवून राप बसलेले एखादे ॲल्युमिनिअमचे पातेले, एक-दोन मडकी, एक-दोन तवल्या (खापरांची खोलगट तव्यासारखी भांडी), एखादया मडक्यात तळाशी चार भाताचे दाणे, शिंक्यावर एक आंबील भरलेले मडके, एका तवलीत एखादे हळकुंड, एक-दोन कांदे, लसणीच्या पाकळ्या, विड्या वळण्यासाठी आणलेली व कुडाला अडकवलेली आपट्याची पाने, फूट-दीड फूट लांबीचा, एका बाजूने बंद असलेला बांबूच्या पेराचा तुकडा भिंतीच्या कारव्यांना अडकवलेला होता. त्यात तंबाक म्हणजे तंबाकूची पाने किंवा तंबाकू ठेवत असत. हा बांबूचा तुकडा म्हणजे जंगलातील बरणीच होती.

आम्ही खोपट्यात गेलो. बाहेर आलो. आम्हांला कोणीही हटकले नाही की तुम्ही कोण, येथे काय करता वगैरे काही विचारले नाही. ग्लानी येऊन निपचित पडलेल्या माणसासारखा सारा पाडा निपचित पडलेला होता. त्या खोपट्याची ती कळा, तेथे नांदणारे अठराविश्वे दारिद्र्य, त्यातच भर म्हणून तेथील भयाण, भकास वातावरण — हे सारे पाहून मी थोडी घाबरलेच. हा भयाण, निर्मनुष्य पाडा आता आपल्याला गिळून टाकणार की काय, असे वाटू लागले. मन अगदी उदास झाले. एक प्रकारची हुरहूर वाटू लागली. मला वाटले, आपण कुठल्या या खाईत येऊन पडलो ? पुढे काय होणार ? आपल्याला माघार घ्यावी लागणार काय ? आपल्याला हे झेपेल काय ?

आम्ही सुमारे तीन मैल चालत गेलो होतो. काहीच काम साधले नाही तर उन्हातान्हातून परत तेवढीच रपेट करावी लागणार होती. मला चहाची फार सवय होती. पुन्हा संजाण स्टेशन गाठीपर्यंत घोटभर चहासुद्धा मिळणे शक्य नव्हते. माझा जीव अगदी रडकुंडीला आला. ध्येयावरील निष्ठा व दरिद्री लोकांबद्दलची तळमळ अविचल असल्यामुळेच मी स्वत:ला सावरून घेऊ शकले. कोणीतरी वयस्क माणूस केव्हातरी भेटेलच,तेव्हा पाहू काय करायचे ते, असा विचार करून कॉमरेड दळवींनी खजुरीच्या झाडाच्या थोड्या खजुऱ्या गोळा करून आणल्या होत्या, त्या चघळत एका ओट्यावर बसलो.

हळूहळू गुरांच्या व बकऱ्यांच्या मागे गेलेल्या मुलांना आम्ही तेथे असल्याची बातमी समजली. बरीच मुले आम्हांला बघण्यासाठी भामच्याभोवती जमा झाली. कोणी हातातल्या काठ्यांवर हनुवट्या ठेवून तर कोणी तशीच उभी राहून नुसती आमच्याकडे

टकमका बघू लागली. घरातली मोठी माणसे कोठे आहेत, अशी चौकशी त्यांच्याकडे केल्यावर समजले, की गावातली सारी जाणती माणसे, एकूण एक जमीनमालकांच्या वेठीला गेलेली होती. त्या मुलांपैकी एक-दोन समंजस वाटली. त्यांना आम्ही सांगितले, ''मोठ्या माणसांना जाऊन सांगा, की टिटवाळ्याच्या सभेतले लोक आले आहेत. त्यांनी तुम्हांला बोलावलं आहे. त्यांना घेऊनच तुम्ही परत या.'' त्या मुलांनी आपापसांत काहीतरी कुजबूज केली व ती मार्गाला लागली. ती आमचा निरोप पोचवणार की काय करणार, आम्हांला काहीच समजले नाही. त्यानंतर बाकीच्या मुलांपैकी बरीचशी पांगली व आम्ही त्यांच्या नजरकैदेतून सुटलो.

बराच वेळ गेला तरी कोणी येण्याचे चिन्ह दिसेना. त्या भयाण जागेत एक-एक क्षण आम्हांला तासासारखा भासू लागला. ती मुले जी गेली ती कोठे गेली, कोणाला बोलावून आणणार की तशीच कुठेतरी निघून जाणार, काहीच समजेना. मधेच उठावे, पुन्हा बसावे, पुन्हा उठावे असे करत आम्ही तिथेच घुटमळत राहिलो. चहाची तल्लफ जाणवू लागली. दुसरे काहीच करण्यासारखे नसल्यामुळे भूक व तहान तीव्रतेने भासू लागली. मला तर ब्रम्हांड आठवू लागले. मनातली कालवाकालव दडपून, जणू विशेष काहीच नाही असे चेहरे करून, कॉ. दळवी व मी चिकाटीने वारल्यांच्या येण्याची वाट पाहात बसलो.



वारल्यांनी अगदी आमचा अंत पाहिला. कंटाळून नाइलाजाने आम्ही परत जाण्याचा विचार करत होतो. तेवढ्यात आम्ही पाठवलेली मुले व त्यांच्या मागोमाग दोन-तीन वारली येताना दिसले. नुसत्या लंगोट्या घातलेले, उघडेवाघडे, लांब केसांचे अंबाडे बांधलेले ते वारली येताना पाहिले तेव्हा माझ्या जिवात जीव आला. त्यांना लवकर येता आले नाही, कारण मुकादम त्यांना वेठीच्या कामावरून जाऊ देईनात. 'टिटवाळा परिषदेतले लोक' आले आहेत हे कळल्यामुळेच मुकादमाशी थोडा तंटा करून ते आले होते. त्यांच्या चेहऱ्यावर कोणतीच भावना दिसत नव्हती. ते अगदी निर्विकार दिसत होते. आमच्याजवळ आल्यावर त्यांनी त्यांच्या पद्धतीने म्हणजे डाव्या हाताच्या तळव्यावर उजव्या हाताचे कोपर ठेवून, तो नाकापर्यंत उभा धरून, नमस्कार केला. आपापसांत थोडे बोलले व गावातल्या शाळेत, म्हणजे कुडाच्या भिंती असलेल्या एका लांबट चौकोनी झोपडीत आम्हांला घेऊन गेले. ते आमच्याशी काही बोलले नाहीत. आम्ही उभेच होतो. एकाने खोली झाडली, तर दुसऱ्याने आमच्यासाठी हातरी टाकली. मी अगदी थकले होते. कुडाला टेकून हातरीवर बसले. इतक्यात वारल्यांनी एक बाज आणली. मी झोपडीबाहेर झाडाखाली बाज टाकण्यास सांगितले. गावातील निदान प्रमुख मंडळींना बोलावून आणण्यास सांगितले; पण हे वारली लवकर जमणे शक्य नव्हते. सारे वारली जागोजाग वेठीला गेलेले होते. त्यांना वर्दी पोचून जमा होईपर्यंत दुपार उलटून जाईल असा अंदाज होता. जे दहा-पंधरा जण जमले होते ते हळूहळू कुडापाशी ओळीने बसले. मंडळी जमेपर्यंत काम होणार नाही हे त्यांना माहीत होते. आमच्याशी काय बोलावे ते त्यांना सुचेना. सारेजण जमेपर्यत वेळ कसा घालवावा हा आमच्यापुढेही प्रश्नच होता. कॉ. दळवी व मी आपसांत बोलत होतो. थोडा चहा मिळाला तर प्रयत्न करून पाहावा, म्हणून मी त्यांच्यापैकी एकाला प्रश्न केला, ''दादू, थोडा चहा मिळेल का ? सोय होईल का ?'' चहाचे साधन त्यांच्याजवळ काहीच नव्हते. ते विचारात पडले. एकजण म्हणाला, ''बाई, जेवण करणार का ?'' जेवण करणे चहा करण्यापेक्षा त्यांना सोपे होते. त्यांच्याबरोबर त्यांच्याच जेवणातले आम्हांला चालेल, वगैरे आम्ही त्यांना सांगितले. ''बाई, आम्ही गरीब माणसं. या जंगलात काय मिळणार ?'' एवढे बोलून ते आपल्या कामाला लागले. मला वाटले, चहा काही मिळणार नाही, जेवण मिळणार; पण त्यांनी जेवण व चहा दोन्हींच्या तयारीला सुरुवात केली. चहा करायचा म्हणजे त्यांच्यापुढे प्रश्न होता. त्यांच्याकडे साखर नव्हती. त्यांना जरूर लागत नसे. कोणाकडे चहाची पावडर नव्हती. गावात गाय नाही, म्हैस नाही,



त्यामुळे दुधाचा थेंब मिळणे कठीण ! ते आपसांत बोलू लागले.

एक वारली : चहा कसा करायचा, काय रं ?

दुसरा वारली : च्या होय, सोय तर होल, पण साखर कुठं गवसंल ?

तिसरा वारली : आपल्यापायी नाही; पण पाटलाकडे थोडी खांड होवि.

दुसरा वारली : पाटलाकडे गोड (गूळ) मिळेल. पाटलाकडे गोड नाही होवा तर एका शिवराईचा आणू !

पहिला वारली : बाई, तुला गोडाचा चहा चालत आहे का ?

एकाने एका पोराला बोलावून गूळ आणायला सांगितला. चहाची पावडर कोणाकडे मिळेल की काय, याबद्दल थोडे बोलणे झाल्यावर दुसऱ्या एका पोराला भुक्की आणण्यासाठी दुकानावर पाठवले. मी विचारले, ''दुकान कितीसं लांब आहे ?'' ते म्हणाले, ''जवळच आहे. पोर दोन टांगांत परत येईल.'' मागाहून आमच्या लक्षात आले, की सुमारे तीन मैलांच्या परिसरात दुकान नव्हते. मी विचार केला, यांचा दोन टांगांचा अंदाज म्हणजे तीन मैलांचा आहे तर ! चहा-साखरेची विवंचना संपल्यावर

त्यांना दुधाची आठवण झाली. त्यांना दुधाची आठवण होणे हेच आश्चर्य होते. ते चहा घेतलाच तर बिगरदुधाचा घेत. दूध पिणे त्यांना माहीत नव्हते. काहींना तर दुधाचा चहाच आवडत नसे. उलटी येई. चहा करून प्यायचा हे त्यांच्या कधी स्वप्नातसुद्धा आले नसेल. त्यांची परिस्थितीच अशी होती, की चहा आपल्यासाठी नाही हीच त्यांची दृढ भावना होती. आम्हांला बिगरदुधाचा चहा चालेल, असे मी त्यांना सांगितले; परंतु त्यांना ते काही पटेना. त्यांनी आणखी एका मुलाला बोलावून, 'बकरी गवसावयास' सांगितले. गावातल्या बकऱ्या चरण्यासाठी गेल्या होत्या. 'बकरी गवसावयाचे' या शब्दांत, एखादी बकरी शोधून पकडून, दूध काढून आणायचे, हा सारा अर्थ सामावलेला होता. 'बकरी गवस' एवढ्या शब्दांत त्या पोराला सारे समजले व तो त्या कामासाठी निघून गेला. चहाची व्यवस्था झाल्यावर ते जेवणाच्या खटपटीला लागले. जेवण म्हणजे त्यांना ती खटपटच होती.

सारी जमवाजमव होऊन चहा तयार होण्यास बराच वेळ लागणार, हे ओळखून मी शाळेच्या बाहेर, झाडाखाली, बाजेवर जाऊन पडले. कॉ. दळवी झाडाखाली हातरी पसरून निजले. आम्ही दोघे अतिशय थकलो होतो. झाडाखाली गार वाऱ्याच्या झुळकीमुळे आम्हांला ताबडतोब झोप लागली.

एका पळसाच्या पानावर गूळ, एकावर चहाच्या भुक्कीची पुडी, स्वच्छ पाण्याने भरलेले एक मडके, एक स्वच्छ घासलेला टोप, तीन दगड ठेवून पेटवलेली चूल, अशी जय्यत तयारी करून चहा करण्यासाठी वारल्यांनी आम्हांला उठवले. त्यांना वाटले, त्यांनी केलेला चहा आम्हांला आवडणार नाही किंवा चालणार नाही. त्यांनी केलेलाच चहा आम्ही घेऊ असे सांगितल्यावर त्यांना बरे वाटले व एक प्रमुख वारली चहा तयार करण्यासाठी चुलीपुढे सरसावला. काही वारली त्याच्याभोवती बसले. त्यांनी गळवण पातेले भरून पाणी चुलीवर ठेवले. त्यात होता तेवढा गूळ व चहाची भुक्की टाकली आणि दुधाची वाट पाहात ते बसले. सुमारे अर्ध्या तासाने एका पोराने पळसाच्या पानाच्या द्रोणात बकरीचे दूध आणले. तेही त्या पातेल्यात ओतून ते सारे गरगट, पाण्याला थोडा चहाचा रंग येईपर्यंत, खळखळा उकळले. सगळ्यांच्या अगोदर पाहुण्यांनी चहा घ्यावा म्हणून प्रथम दोन लहान लहान पितळ्यांत चहा ओतला. वारल्यांना आम्ही आमच्याबरोबर चहा घेण्यास सांगितले. तेव्हा प्रत्येकाने एक एक पळसाचे पान घेऊन ते द्रोणासारखे वळवून हातात धरले. चहा करणाऱ्याने प्रत्येकाच्या

द्रोणात घोट घोट चहा ओतला. अशा प्रकारे आम्हा दहा-पंधरा माणसांची चहा-पार्टी मोठ्या आनंदात पार पडली.

**प्रश्न :**

अ. खालील प्रश्नांची प्रत्येकी सात ते आठ वाक्यांत उत्तरे लिहा.

१. सालकर पाड्यातील घरांचे वर्णन करा.

२. खोपट्यात गेल्यावर लेखिकेस कोणते दृश्य दिसले ?

३. गावच्या शाळेत गेल्यावर लोकांनी लेखिकेचे कशा प्रकारे स्वागत केले ?

४. चहा करताना साधनसामग्रीसाठी आलेल्या अडचणी वारल्यांनी कशा सोडवल्या ?

आ. खालील प्रश्नांची प्रत्येकी तीन ते चार वाक्यांत उत्तरे लिहा.

१. पाड्याचे विशेष सांगणारी कोणती माहिती पाठात आलेली आहे ?

२. जेवण तयार करणे हे चहा करण्यापेक्षा वारल्यांच्या दृष्टीने सोपे का होते ?

३. मुलांच्यामुळे व कुत्र्यांच्या भुंकण्यामुळे तेथे मनुष्यवस्तीचा भास होत होता असे लेखिका का म्हणते ?

४. वारल्यांना एकत्र यायला विलंब का लागत होता ?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. खालील वाक्यांतील भाषासौंदर्य समजून घ्या.

अ. पाखरांचा चिवचिवाट व कोंबड्यांचा फडफडाट सोडला तर सारा शुकशुकाट होता.

ब. ग्लानी येऊन निपचित पडलेल्या माणसासारखा सारा पाडा निपचित पडलेला होता.

क. यांचा दोन टांगांचा अंदाज म्हणजे तीन मैलांचा आहे तर !

२. चहा करण्याच्या प्रसंगाचे पाठात आलेले शब्दचित्र रेखाटा.

३. अठरा विश्वे दारिद्र्य असणे, जिवात जीव येणे, जीव रडकुंडीला येणे या वाक्प्रचारांचा वाक्यांत उपयोग करा.





# १६. सैनिकी रक्त

**लक्ष्मीकांत तांबोळी (लक्ष्मीकांत सखाराम तांबोळी - जन्म : १९३९)**

मराठीतील प्रसिद्ध साहित्यिक.'अस्वस्थ सूर्यास्त' 'हुंकार'हे कवितासंग्रह; 'कृष्णकमळ', 'दूर गेलेले घर' या कादंबऱ्या; 'तवंग' हा कथासंग्रह ही त्यांची पुस्तके प्रसिद्ध आहेत.

ही कथा 'तवंग' या कथासंग्रहातून घेतली आहे.

'देशासाठी शत्रूशी सामना करताना रणांगणात तोफा, रणगाडे आणि बंदुका यांच्या सलामीत मृत्यू यावा' असे स्वप्न उराशी बाळगणाऱ्या शंकरराव कदम यांच्या जीवनातील ही कथा आहे.

---

दोन महिन्यांपासून मेजर शंकरराव कदम आजारी होते. दिवसेंदिवस आजार वाढत होता. डॉक्टर प्रकृती तपासून जात होते. रोगाचे निदान काही केल्या होत नव्हते. छातीतून एकसारख्या कळा निघत. कधी कधी वेदना एवढ्या असह्य होत, की ते बेशुद्धही पडत. घरातली माणसे चिंताक्रांत होती. कुणाला काहीच सुचत नव्हते. अन्नपाणी गोड लागत नव्हते. काही गोष्टी वाटून घेता येत नाहीत. तसे असते तर कुणीही शंकररावांचा आजार वाटून घेतला असता. रात्री-अपरात्री छातीतून अशी काही चमक निघे, की वाटे आता खेळ खलास; पण आलेला मृत्यू उंबरठ्यावरूनच परत जाई. घरातल्या माणसांचा जीव मोकळा होई.

ओळखीचे अनेक लोक येत आणि भेटून जात. शंकररावांकडे पाहिले, की काळजाचे पाणी होई. एवढा मोठा पहाडासारखा माणूस; पण या आजाराने पार खचला होता, खंगला होता. मूळचीच प्रकृती निकोप म्हणून ते कसाबसा तग धरून होते. शंकरराव कमालीच्या जिद्दीने मृत्यूशी झुंजत होते. झुंजणे त्यांच्या रक्ताचा गुणच होता. साध्या सैनिकापासून चढत चढत ते मेजर झाले होते. बहुमानाची कितीतरी पदके त्यांनी मिळवली होती. दुसऱ्या महायुद्धात त्यांनी आपल्या पराक्रमाची शर्थ केली. प्रसंगी अन्नावाचून दिवस काढले; पण शेवटपर्यंत झुंजत राहिले. शत्रूच्या गोळीची निशाणी अजूनही त्यांच्या उजव्या दंडावर कायम आहे. बोलताना त्या जखमेचा ते मोठ्या अभिमानाने उल्लेख करत. अर्धे आयुष्य रणांगणात नि मृत्यूशी झुंजण्यात घालवलेल्या

शंकररावांना उत्तरकाळात कष्टाचे फळ मिळाले. पुरुषार्थ सफल झाला. अवघे आयुष्य वैभवाने उजळून निघाले. घर नातवासुनांनी गजबजले. दोन्ही मुले कर्तबगार निघाली. थोरला डॉक्टर नि धाकटा फ्लाईट लेफ्टनंट. सगळे कसे मनासारखे झाले होते. केव्हाही मरण आले, तरी आता शंकरराव तयार होते. त्यांना मृत्यूची भीती वाटत नव्हती; पण आजारी पडून मृत्यू यावा याचे त्यांना दुःख वाटत होते. मृत्यू यावा तर तो रणांगणात. शत्रूशी सामना देत असताना... तोफा, रणगाडे आणि बंदुका यांच्या सलामीत... हे त्यांचे लाडके स्वप्न होते. अगदी सामान्य माणसासारखे मरायचे म्हणजे काय ? मरणाला चुकवत, शंकरराव आला दिवस मागे टाकत होते.

भारतीय विमानदलात असलेला त्यांचा धाकटा मुलगा सुरेंद्र, वडील आजारी असल्याची तार आली म्हणून मुद्दाम रजा घेऊन भेटायला आला. शंकररावांना कमालीचा आनंद झाला. त्यांची प्रकृतीदेखील थोडीशी सुधारली. त्यांचा थोरला मुलगा चांगला नामवंत डॉक्टर होता; परंतु शंकररावांना अभिमान वाटत होता तो सुरेंद्राचा. आपल्यां घराण्यातला प्रत्येक माणूस सैन्यातच असला पाहिजे अशी त्यांची इच्छा. थोरल्याने ही इच्छा कधीच पूर्ण केली नाही. धाकट्याने मात्र त्यांचे ऐकले होते. सुरेंद्र पराक्रमी होऊन नाव काढील याची शंकररावांना खात्री होती. तो आल्यापासून ते त्याच्याशी बोलत असत. त्याच्याशी बोलण्यात त्यांना स्वतःच्या आजारपणाचा एकदम विसर पडे. आयुष्यात केलेल्या पराक्रमाच्या कथा सांगताना ते बेभान होत. मनाने पुन्हा एकदा ते पूर्वीचे जीवन जगू लागत. आठ-पंधरा दिवसांत शंकररावांची प्रकृती सुधारली. अधूनमधून येणाऱ्या कळा बंद झाल्या होत्या. सर्वांचे चेहरे उजळले होते. चिंतेचे वातावरण काहीसे निवळले होते.

आणि एके दिवशी पाक आक्रमणाविरुद्ध लढण्यासाठी रुजू होण्याबद्दलची तार येऊन धडकली. सुरेंद्राची दोन महिन्यांची रजा एकदम रद्द करण्यात आली होती. तार आलेली कळताच शंकरराव एकदम बिछान्यावर उठून बसले. त्यांच्या अंगात एवढे बळ कोठून आले याचेच सर्वांना नवल वाटत होते.

''बेटा सुरेंद्र,'' शंकररावांनी मोठ्या खुशीत हाक मारली. सुरेंद्र जड पावलांनी त्यांच्याजवळ आला. घरातले वातावरण एकदम पालटले होते. सर्वांचे चेहरे पुन्हा चिंताग्रस्त झाले होते. आनंद वाटत होता तो फक्त शंकररावांना. सुरेंद्र जड पावलांनी येत आहे हे पाहताच ते ओरडले, ''असा भेदरटासारखा काय चालतोस ? भीती वाटते युद्धाची ?''

''तसं नाही दादा. पण तुम्ही आजारी असताना...''

''तिकडे देश संकटात सापडलाय नि तुला माझी काळजी वाटते? तू सैनिक आहेस, हे लक्षात ठेव. सैनिकाला नातंगोतं काही नसतं. नातं फक्त देशाशी, रणांगणाशी... आजच दुपारच्या गाडीनं नीघ. माझी काळजी करू नकोस. मी काय, आज आहे उद्या नाही. आणि खरं सांगतो, आता मी बरा होणार, खात्रीने सुधारणार... जा तयारीला लाग.''

सुरेंद्रच्या डोळ्यांत एकदम पाणी आले.

''रडतोस काय असा...'' शंकरराव पुन्हा खेकसले, ''चल आटप लवकर, मी येतो स्टेशनवर पोचवायला.''

शंकरराव ताडकन उठून उभे राहिले. सर्वांना आणखी एक धक्का बसला. आता जर शंकररावांना कुणी पाहिले असते तर ते आजारी होते, हे कुणालाही खरे वाटले नसते. कुठलीतरी अद्‌भुत शक्ती त्यांच्या अंगात संचारली होती. त्यांच्या रोमारोमातून उत्साह ओसंडत होता.

गेल्या दोन महिन्यांपासून गाडी गॅरेजमध्ये तशीच पडून होती. शंकररावांनी ती बाहेर काढायला सांगितले नि ड्रायव्हरला बजावले, ''धाकट्या साहेबांचं सामान गाडीत ठेव. आज मी गाडी चालवणार.''

काही बोलण्याची सोय नव्हती. शंकररावांच्या तब्येतीत अकस्मात घडलेला हा बदल सर्वांना एकामागून एक आश्‍चर्याचे धक्के देत होता. कधी नाही ते त्या दिवशी शंकरराव मनसोक्त जेवले.

दिवसांमागून दिवस जात होते. शंकररावांची प्रकृती चांगलीच सुधारली होती. गाडी घेऊन फिरायला जाणे, भरपेट खाणे, नातवांना खेळवणे आणि उरलेल्या वेळात रेडिओवरील युद्‌धाच्या बातम्या ऐकणे असा त्यांचा कार्यक्रम चालू होता. प्रत्येक दिवस नव्या-नव्या वार्ता घेऊन येऊ लागला. वर्तमानपत्रांचे रकाने जवानांच्या पराक्रमांच्या वर्णनांनी भरू लागले. रेडिओवरील बातम्या ऐकताना शंकररावांचे हृदय भरून येई. संगीन उचलण्यासाठी हात शिवशिवत. कधी कधी तर ते इतके अनावर होत, की नकळत त्यांच्या तोंडून 'शाब्बास...! जीते रहो... मारो, पीटो...' असे उद्‌गार बाहेर पडत.

शत्रूच्या सैन्याचा धुव्वा उडवत आपले जवान एक-एक ठाणे जिंकत होते. शत्रूची

प्रचंड हानी करून आपल्या जवानांची सरशी होत होती. आज काय अमुक जिंकले, उदद्या काय शत्रूचे सात पॅटन रणगाडे निकामी केले. अशा एक की दोन, अनेक बातम्या येत होत्या. शंकररावांची छाती आनंदाने आणि अभिमानाने फुलून गेली होती. दररोजच्या बातम्या ऐकण्यासाठी शंकरराव रेडिओशी कान लावून बसू लागले. युद्ध, बाँब, रणगाडे, हल्ला या शब्दांशिवाय त्यांचे बोलणेच होईनासे झाले.

आणि रेडिओवर एके दिवशी आणखी एक बातमी येऊन धडकली. ''लाहोर आघाडीवर शत्रूचे एक सेबरजेट विमान पाडत असता, फ्लाईट लेफ्टनंट श्री. सुरेंद्र शंकरराव कदम यांना वीराचे मरण आले...''

घरात आकांत झाला. सगळी माणसे रडायला लागली. शंकररावांच्या डोळ्यांत मात्र पाण्याचा थेंबही आला नाही.

सात-आठ दिवसांनंतर लगेच सुरेंद्राला 'वीरचक्र' पदक दिल्याचे वर्तमानपत्रातून जाहीर करण्यात आले. आल्या-गेल्याजवळ शंकरराव याच एका विषयावर बोलत होते. मुलाच्या पराक्रमाची हकीगत रंगून सांगत होते. त्यांना बोलण्यासाठी आता दुसरा विषयच उरला नव्हता.

क्षणाक्षणाला युद्धाच्या ज्वाला भडकत होत्या. नित्य नव्या, सनसनाटी बातम्या झळकत होत्या. भारतीय जवानांची आगेकूच चालूच होती. सबंध भारत उत्साहाने फुलून गेला होता.

शंकरराव तर बेभान झाले होते. युद्ध, युद्धवार्ता याशिवाय त्यांना दुसरे काहीच सुचत नव्हते. सबंध आयुष्य रणांगणावर घालवलेल्या शंकररावांना गप्प बसवत नव्हते. उठावे नि बंदूक घेऊन आघाडीवर जावे असे त्यांना सारखे वाटत होते. त्यांना दुसरे काही सुचतच नसे. पुत्रमरणाचे दुःख तर त्यांच्या खिजगणतीतही नव्हते. कधी आठवण आलीच तर ते मनाशीच म्हणत, 'मुलगा मारला गेला... मारला गेला म्हणून काय झालं ? आला माणूस कधीतरी जाणारच. तो तर रणांगणात गेला, वीराचं मरण आलं त्याला. नाव राखलं घराण्याचं. नाहीतरी कुत्र्याचं जिणं जगणारे लोक आहेतच की या जगात. त्यापेक्षा शूराचं मरण बरं. आजारी पडून मरण्यापेक्षा शत्रूशी लढताना मेलेलं लाखपटीनं चांगलं.' असे कितीतरी विचार त्यांच्या डोक्यात गर्दी करत. त्यांचे सैनिकी रक्त उचंबळून आले होते. ध्यानी, मनी, स्वप्नी त्यांना दिसत होते फक्त युद्ध... तोफा... रणगाडे... विमाने, खडखडाट नि धडाम् धूम... फक्त युद्ध ! युद्ध !! आणि युद्ध !!!

पण एके दिवशी युद्ध बंद झाल्याची बातमी येऊन धडकली !

''युद्ध बंद ! म्हणजे... ?'' एवढेच शब्द शंकररावांच्या तोंडून निघाले. छातीतून एक जोरदार कळ निघाली नि ते धाडकन कोसळून पडले.

**प्रश्न :**

खालील प्रश्नांची थोडक्यात उत्तरे लिहा.

१. आजारपणामध्ये शंकररावांना कोणती खंत वाटत होती ?

२. शंकररावांच्या प्रकृतीत केव्हा सुधारणा झाली ?

३. शंकरराव आपल्या मुलावर का रागावले ?

४. शंकररावांच्या अंगात अद्‌भुत शक्ती संचारली असे का म्हटले आहे ?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. काळजाचे पाणी होणे, खचून जाणे, पराक्रमाची शर्थ करणे, झुंज देणे, नाव काढणे, उत्साह ओसंडणे या शब्दसमूहांचा वाक्यांत उपयोग करा.

२. 'सैनिकी रक्त' हे शीर्षक पाठाला कसे योग्य वाटते ते थोडक्यात लिहा.





# १७. वाचन

**गो. ग. आगरकर (गोपाळ गणेश आगरकर - १८५६-१८९५)**

समाजसुधारणेचा पुरस्कार करणारे निबंधकार. केसरीचे पहिले संपादक. 'केसरीतील निवडक निबंध'; 'संपूर्ण आगरकर : निबंधसंग्रह' या ग्रंथात आगरकरांचे विविध विषयांवरील निबंध संग्रहित केले आहेत. 'डोंगरीच्या तुरुंगातील एकशे एक दिवस' हे आत्मचरित्र आणि इतर अनेक पुस्तके प्रसिद्ध आहेत. हा पाठ 'आगरकर लेखसंग्रह' या पुस्तकातून घेतला आहे.

या पाठात वाचनापासून होणारे विविध फायदे सांगितले आहेत.

---

गुरुमुख, वाचन, विचार, अवलोकन, संवाद इत्यादी ज्ञानसंपादनाची अनेक द्वारे आहेत. त्यांपैकी वाचन हे अत्यंत महत्त्वाचे आहे. वाचनाचे दोन प्रकार आहेत. एक दुसऱ्यासाठी व एक स्वत:साठी. आपण जे वाचतो, ते आपले आपण लिहिलेले असेल किंवा दुसऱ्याने लिहिलेले असेल. कोणतेही पुस्तक किंवा लेख वाचण्यासाठी हातात घेण्यात दोन हेतू असतात — माहिती मिळवणे किंवा करमणूक करून घेणे. पुस्तके ज्या प्रकारची असतील त्या प्रकारचा परिणाम, ती वाचणाऱ्याच्या मनावर होईल. वाईट पुस्तके वाचण्यापेक्षा काही न करणे बरे; कारण, काही न करण्याने मनाला निदान कोणताही वाईट नाद तरी लागत नाही. ज्यांनी वाचनाचे पवाडे गायले आहेत, त्यांनी ते चांगल्या वाचनाचे गायले आहेत. पुस्तके ही एक प्रकारचे मित्र आहेत. बहुश्रुत सन्मित्राच्या सहवासापासून होणारे बहुतेक फायदे चांगल्या वाचनापासून होऊन, शिवाय त्या सहवासापासून न होणारे असेही अनेक फायदे होतात.

ज्ञानाचा ज्या चार साधनांविषयी वर थोडासा उल्लेख केला आहे, ती सर्वांस प्राप्त असतील किंवा नसतील, वाचन मात्र स्वल्प खर्चाने किंवा थोड्याशा अंगमेहनतीने सर्वांस प्राप्त होण्यासारखे आहे. विद्वान गुरू भेटेल किंवा न भेटेल, संवाद करण्यासारखा मित्र प्राप्त असेल किंवा नसेल, स्वतंत्रपणे बिनचूक विचार करता येण्यासारखे शिक्षण मिळाले असेल किंवा नसेल, सहज घेता येणारे किंवा बुद्ध्या घ्यावे लागणारे अनुभव घेऊन पाहण्याच्या सोई असतील किंवा नसतील; पण

वाचन.ची मात्र तशी स्थिती नाही. मुद्रणकला भरभराटीस आल्यापासून हे ज्ञानसाधन अत्यंत सुगम झाले आहे. किंबहुना काही स्थितींत ज्ञान करून घेण्यास दुसरे कोणतेही साधन उपयोगी पडतच नाही.

कोणत्याही विद्वानाला कोणत्याही विषयावरील आपले विचार सर्व ठिकाणी स्वत: हजर राहून स्वमुखाने सांगता येणे अशक्य आहे. पण तेच त्याने लिहून काढले व पुस्तकरूपाने प्रसिद्ध केले, तर त्याच्यापासून पाहिजे त्याला फायदा करून घेता येणार आहे. वाल्मिकी-व्यासादी महाकवींनी आपले विचार लिहून ठेवले नसते, तर 'रामायण' आणि 'महाभारत' यांच्यापासून लोकांना आज हजार वर्षे जे ज्ञान व जी करमणूक होत आहे, ती कोठून होती ? या महापुराणांप्रमाणेच एतद्देशीय इतर ग्रंथांची व परदेशी ग्रंथांची गोष्ट आहे. पुस्तकाद्वारा इंग्रजी भाषेतील ज्ञानभांडार आम्हांस खुले झाल्यामुळे आम्हांस केवढा लाभ होत आहे ? अलीकडील पाश्चिमात्य भाषांत भाषांतराच्या साहाय्याने सुधारलेल्या भाषांतील उत्कृष्ट उत्कृष्ट विचारांचा संग्रह केला आहे व प्रतिदिवशी करत आहेत. इंग्रजी या एका भाषेतील ग्रंथ आम्हांस वाचनास मिळू लागले त्यामुळे युरोपात फार प्राचीन कालापासून आजपर्यंत झालेल्या विद्वानांपैकी ज्यांनी आपले विचार लिहून ठेवले आहेत, त्यांची भाषांतरे आम्हांस वाचण्यास सापडणार आहेत. सारांश काय, की महान महान तत्त्ववेत्ते, इतिहासकार, शास्त्रज्ञ व कवी आपापले विचार पुस्तकरूपी नौकेत घालून न ठेवते, तर ते काळाच्या ओघात कधीच बुडून जाते व त्यांचा यत्किंचितही मागमूस आम्हांस लागला नसता; पण त्यांनी आपले विचार ग्रथित केले; यामुळे विचाररूपी मालाने भरलेल्या या ग्रंथनौका पाहिजे त्याला हव्या त्या किनाऱ्यावर उतरून घेऊन त्यातील मालास हात घालता येतो!

गुरुमुखापासून होणारा फायदा विद्यार्थ्यास फार झाले तर शाळेत किंवा विद्यालयात करून घेता येतो. एकदा शाळा सुटली किंवा विद्यालयीन पदवी प्राप्त झाली म्हणजे गुरूला सोडून व्यवहारात पडावे लागते. व्यवहार पाठीमागे लागला म्हणजे ज्ञानसंपादनास पुस्तकांशिवाय दुसरे साधन राहात नाही. शिकलेल्या लोकांपैकी शेकडा पंचाण्णवांना नोकरीत किंवा उद्योगात पडल्यावर वाचनाची इच्छा मुळीच राहात नाही, असे आमच्या सध्याच्या स्थितीवरून दिसते. चांगली चांगली पुस्तके व वर्तमानपत्रे नित्य वाचत असल्याने ज्ञानाची एकसारखी वृद्धी होत असते व त्याचा व्यवहारात उपयोग होत असतो. मनुष्याला पोटासाठी जो एक धंदा करायचा असतो

त्याच्याशिवाय इतर गोष्टींचे ज्ञान त्याने संपादले असता ते त्याला मुळीच उपयोगी पडणार नाही की काय ? जे कोणी असे समजत असतील ते मोठा प्रमाद करतात असे म्हणण्यास हरकत नाही. नित्याच्या धंद्याशिवाय इतर गोष्टींचे ज्ञान संपादण्यात कोणतेही नुकसान नाही; पण तसे न करण्यात मात्र फार नुकसान आहे. प्रपंचात प्रतिदिवशी लहानमोठ्या शेकडो अडचणी येतात. त्यांचा परिहार कसा करावा हे ठाऊक नसले तर किती पंचाईत पडते ?

संसारात वारंवार येणाऱ्या अडचणींतून पार पडण्यात वाचनापासून साहाय्य होते. हा वाचनापासून होणारा अगदी हलक्या प्रतीचा फायदा आहे. ज्यांना जिवंतपणी आपणांस 'हे मागल्या पिढीचे' असे म्हणवून घ्यायचे नसेल, त्यांनी वाचनाची सवय नेहमी जागृत ठेवली पाहिजे. जगात प्रतिवर्षी नवीन कल्पना, नवीन शोध, नवीन युक्त्या निघून जुन्या कल्पना, जुने शोध व जुन्या युक्त्या एकापाठीमागून एक मागे पडत आहेत. जे शाळेत किंवा विद्यालयात संपादलेल्या ज्ञानासच चिकटून राहतात व व्यवहारात पडल्यावर वाचनाची सवय ठेवत नाहीत, त्यांना आपल्या जुनेपणाबद्दल आपला उपहास करून घ्यावा लागतो. शिक्षक, वैद्य, कारागीर, नोकर यांपैकी ज्यांनी वाचनाची सवय ठेवलेली नसते, त्यांना त्यांच्या धंद्यात झालेल्या सुधारणा न कळल्यापासून होणारे नुकसान सोसावे लागते, इतकेच नाही तर ज्या तरुण लोकांचा आणि त्यांचा संबंध येतो, त्यात त्यांची थट्टा होऊ लागते. ठळक ठळक गोष्टींची चालू तारखेपर्यंत काय हालहवाल आहे, हे माहीत नसणे म्हणजे एकोणिसाव्या शतकात जन्मास येऊन अठराव्या शतकातल्या मनुष्याप्रमाणे वागणे होय.

**प्रश्न :**

अ. खालील प्रश्नांची उत्तरे प्रत्येकी आठ ते दहा वाक्यांत लिहा.

१. लेखकाने ज्ञानसंपादनाची कोणती साधने सांगितली आहेत ? का ?

२. ज्ञानसंपादनासाठी वाचन हे महत्त्वाचे साधन कशामुळे ठरते ?

३. विचारवंतांनी आपले विचार पुस्तकरूपाने प्रसिद्ध केल्यामुळे कोणता फायदा झाला ?

४. वाचन न केल्याने कोणते नुकसान होते ?

आ. खालील वाक्यांचे प्रत्येकी पाच ते सहा वाक्यांत स्पष्टीकरण करा.

१. 'पुस्तके ही एक प्रकारचे मित्र आहेत.'

२. 'जे शाळेत किंवा विद्यालयात संपादलेल्या ज्ञानासच चिकटून राहतात व व्यवहारात पडल्यावर वाचनाची सवय ठेवत नाहीत, त्यांना आपल्या जुनेपणाबद्दल आपला उपहास करून घ्यावा लागतो.'

## स्वाध्याय व उपक्रम :

१. प्राप्य, बुद्ध्या, एतद्देशीय, पाश्चिमात्य, तत्त्ववेत्ते या शब्दांचा अर्थ लिहून त्यांचा स्वत:च्या वाक्यांत उपयोग करा.

२. 'ग्रंथ हे आपले गुरू आहेत' या विषयावर तुम्हांला भाषण करायचे आहे असे समजून त्याचे टाचण तयार करा.

३. तुम्ही वाचलेली एखादी गोष्ट, तुम्हांला ती आवडली असल्यास तुमच्या मित्राने ती वाचावी म्हणून त्याला गोष्टीची शिफारस करणारे पत्र लिहा.





# १८. गारपीट

ज्ञानदा नाईक (जन्म : १९५०)

बाल व किशोरवयीन मुलांसाठी लिहिणाऱ्या नव्या पिढीतील लेखिका. 'गुलमोहराची माया', 'आर्य चाणक्य', 'झाडावरले घरटे', 'तेरेखोलचे रहस्य' ही व इतर प्रवासवर्णनाची व ललित पुस्तके प्रसिद्ध आहेत. हा पाठ 'किशोर' दिवाळी अंक-८९ मधून घेतला आहे.

मानवी जीवन फुलवणारा, मन मोहून टाकणारा आणि क्षणात सारं उद्ध्वस्त करणारा, रुद्र रूप धारण करणारा निसर्ग ही दोन्ही रूपे या पाठात आली आहेत.

---

जळगावपासच्या छोट्याशा खेड्यातल्या शेतावर आम्ही हिंडत होतो. मार्च महिन्याची अखेर होती. शेतातल्या काही भागांत कापणी झाली होती. काही भागांत मिरच्यांची तोडणी चालू होती. हिरव्या-तांबड्या मिरच्या चटाचटा तोडून अनेक बाया टोपल्या भरत होत्या. शेजारीच फळबागा होत्या. पलीकडे कापसाच्या बोंडांनी भरदिवसा चांदणे अंथरले होते. पाटाचे पाणी खळाळत धावत होते.

दिवस बुडायला तसा बराच अवधी होता. अचानक अंधारून आले. आकाशात काळे ढग भरभरून आले. समोरून प्रचंड वेगाने वाऱ्याचे झोत संतापलेल्या नागासारखे फुत्कारे टाकत यायला लागले. हारीने लावलेली निलगिरीची उंच झाडे गदगदून हालू लागली. छोटी छोटी झाडे पक्ष्यांसारखी फडफडू लागली. जमिनीवरल्या पाचोळ्याने फेर धरले. धूळ उडू लागली आणि हा हा म्हणता तिचा प्रचंड पडदाच उभा राहिला. पलीकडले शेतच काय, पण शेजारचे माणूसही दिसेनासे झाले. आमची पळता भुई थोडी झाली. ''धावा... पळा... तिथे थांबू नका !'' अशी हाकाटी मी ऐकली आणि कशीबशी त्या शेतावरल्या घराची ओसरी गाठली.

झंझावाती वारे... प्रचंड धूळ... रों रों आवाज... निसर्गाचे ते रूप पाहून जीव दडपून गेला. चारी दिशांनी धुळीची उधळण चालू होती. ढगांचे नगारे जोरात गडगडाट करत वाजत होते. आडोशाला भेदरलेली गुरे दिसत होती. कुत्री घशातच आवाज करत भिंतीला चिकटून उभी होती. पक्षी कुठे गेले बापडे कुणास ठाऊक!



काही वेळ तसाच गेला आणि कोरड्या जमिनीवर थेंबांचे काळे करडे ठिपके उठले. मातीचा सुगंध दरवळला. टपोऱ्या थेंबांनी जमिनीवर तिरकस उड्या घेतल्या आणि पाहता पाहता सरी वेगाने कोसळू लागल्या. जमिनीवर वेगाने आपटून थेंबांच्या ठिकऱ्या उडू लागल्या. पाठोपाठ गारा आपटू लागल्या. झाडांचे शेंडे वाकले. पाती जमिनीला टेकली.

जलधारांचे ते नृत्य पाहताना भान हरपून गेले. तेवढ्यात ओसरीला लागूनच असलेल्या एका खोलीमधून सामुदायिक गीताचे सूर ऐकू येऊ लागले. मी त्या खोलीकडे धावले. आत शेतमजूर स्त्रिया दाटीवाटीने बसल्या होत्या. खोलीत दिवा नव्हता. त्यांच्या अंगावरल्या चांदीच्या दागिन्यांचा खुळखुळाट होत होता. त्यांनी ताल धरला होता. बेभानपणे त्या गात होत्या. सोबतची माणसेही त्यांच्या गाण्यात मधूनच सूर मिसळत होती. मानवाच्या आनंदाचा तो आविष्कार पाहून मी थक्क झाले. तो आनंद त्यांच्या काळजातून उसळून बाहेर पडत होता. ही सारी मंडळी आदिवासी दिसत होती. रंगीबेरंगी वस्त्रे, दागिने आणि प्रसन्न चेहरे. गाण्याची भाषा, त्यातले

शब्द अनोळखी होते; पण त्यातले सूर मनाला भिडत होते. बाहेर निसर्गाचा जल्लोष चालू होता. आत मानवाचा आनंद बहरून आला होता.

कोसळणाऱ्या धारा सारी धरित्री धुऊन टाकतच होत्या. या सरींनी आज या धरतीच्या कुशीत कितीतरी बीजे अंकुरली असतील आणि या सुरांनी कितीतरी कोंब उभरून आले असतील.

दुसऱ्या दिवशी सकाळीच आम्ही परतीच्या वाटेला लागलो. निसर्गाचे सारे रूप पार पालटून गेलेले होते. काल मोठ्या दिमाख़ात फळांचा संभार पेलणारी मोसंबीची बाग छिन्नविच्छिन्न झाल्यासारखी दिसत होती. कुठे फांद्या तुटलेल्या तर कुठे शेंडे तुटलेले. प्रत्येक झाडाच्या भोवती पिवळ्याधमक फळांचा खच चिखलात पडलेला होता. बागेची पार रया गेली होती.

शुभ्र कापसाची शेते चिखलाने बरबटलेली होती. उंच झाडे मुळासकट उन्मळून पडली होती. मिरच्यांच्या झुडपांचा पार काला झाला होता. काल जिथे वीत वीत लांबीची कणसे झुलत होती, ती शेते आज अगदी उजाड, उदास दिसत होती. झाडांची पाने वाऱ्याने पार ओरबाडून टाकली होती. ते सारे दृश्य पाहून, निसर्गाने केलेला तो विध्वंस पाहून आम्ही मुक्या मनाने गावाबाहेर पडलो. काल जे अनुभवले ते खरे, की आज जे दिसत आहे ते खरे अशा संभ्रमात आम्ही पुढे निघालो.





गावाकडून निघालेला रस्ता जिथे हमरस्त्याला मिळत होता, त्या वळणाशी एक दृश्य दिसले. वीस-पंचवीस बायका-पुरुषांचा एक तांडा गावाच्या दिशेने येत होता. सारेजण बरेच अंतर चालून आलेले असावेत. कुणाच्या चेहऱ्यावर थकवा नव्हता, की कसली चिंता दिसत नव्हती. साऱ्यांचे चेहरे प्रसन्न होते. आपसांत बोलत, हास्यविनोद करत ते येत होते. बायकांनी तांबड्या-पिवळ्या काठांची भडक लुगडी नेसली होती. केसांचे बुचडे होते. पुरुषांच्या डोक्याभोवती मळकी वस्त्रे गुंडाळलेली होती. गुडघ्यापर्यंत नेसलेल्या धोतराखाली दिसणारे त्यांचे पाय हरणांच्या पायांसारखे काटकुळे आणि काटक दिसत होते. जाड, जड, चिखलाने भरलेली पायताणे उचलत खांद्यांवरली पोरे सावरत ते चालले होते. बरोबर ३-४ कुत्री होती. गाढवे होती. त्यांच्या पाठीवर बोचकी, सुपे, टोपल्या आणि कोंबड्या होत्या. कुंची घातलेली दोन पोरे एका सामान लादलेल्या गाढवावर सामानातच बसलेली होती. कुठून आली आणि कुठे चालली होती ही सारी ?

त्या वळणावरचे एक भलेथोरले पिंपळाचे झाड पाहून तांडा थबकला. पाठीमागून ओहळ खळाळत होता. त्या उघड्या माळावरच आता ते सारेजण आपला तळ ठोकणार होते. कुण्या एका मुलीने एक फाटका झेंडा ठोकून रोवला. पाले उभारण्याचे काम सुरू झाले. बायांनी तीन धोंडे मांडले. चुली पेटल्या, कालवणे खदखदू लागली.

तान्ही खेळूबागडू लागली. त्यात कुत्र्यांचे भुंकणे, कोंबड्यांचा कलकलाट ! आता आभाळ स्वच्छ होते. निळे, झुळझुळीत दिसत होते. वारा शांत होता. ऊन सर्वत्र पडले होते. अंग गोळा करून बसलेले पक्षी मोकळे झाले. पंख फडफडवून त्यांनी आवाज केला. झाडांच्या सावलीतून बाहेर पडून ते चमकदार उन्हात आले. गवतात हिंडणाऱ्या, तुरुतुरु चालणाऱ्या लाव्हा पक्ष्यांमागे तांड्यातली दोन पोरे धावली.

पावसाने, गारपिटीने झोडपले म्हणून शेते उजाड झाली होती. फळबागा उद्ध्वस्त झाल्या होत्या. झाडे उन्मळून कोसळली होती; पण माणूस मात्र झेंडा रोवून जिद्दीने पाले उभारतच होता.

**प्रश्न :**

अ. खालील प्रश्नांची उत्तरे प्रत्येकी पाच ते सहा वाक्यांत लिहा.

१. अचानक अंधारून आल्यानंतर त्या खेड्यात वाऱ्याने कोणता गोंधळ उडवून दिला ?

२. पाऊस पडू लागल्यावर त्या ठिकाणी कोणते दृश्य दिसू लागले ?

३. या प्रसंगी आदिवासी मंडळी खोलीत काय करत होती ?

४. दुसऱ्या दिवशी त्याच गावी काय घडून आले ?

५. गावाकडून निघालेल्या रस्त्याच्या वळणावर लेखिकेला काय दिसले ?

आ. खालील प्रश्नांची उत्तरे प्रत्येकी दोन ते तीन वाक्यांत सांगा.

१. मार्च महिन्याच्या अखेरीला त्या खेड्यातल्या शेतात कोणती कामे चाललेली होती ?

२. लेखिकेने ओसरीला लागून असलेल्या खोलीकडे का धाव घेतली ?

३. काल जे अनुभवले ते खरे की आज दिसत आहे ते खरे, असा प्रश्न कोणाला व का पडला ?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. खालील शब्दांचा वाक्यांत उपयोग करा.

मनसोक्त, अक्षरशः, पार्श्वसंगीत, सहस्रावधी, पुलकित, उत्स्फूर्त, जल्लोष, विध्वंस, उद्ध्वस्त.

२. 'वादळवाऱ्याचा दिवस' या शीर्षकाखाली तुम्हांला आलेला अनुभव वीस ते पंचवीस वाक्यांत लिहा.





# १९. आकाशकन्या

**रामचंद्र देखणे (रामचंद्र अनंत देखणे - जन्म : १९५६)**

मराठीतील प्रसिद्ध साहित्यिक, संत साहित्याचे व लोकवाङ्मयाचे व्यासंगी अभ्यासक. 'भूमिपुत्र', 'बहुरूपी महाराष्ट्र', 'भारूड वाङ्मयातील तत्त्वज्ञान', 'लोकशिक्षक गाडगेबाबा', 'जीवनयोगी साने गुरुजी' इत्यादी २५ पुस्तके आतापर्यंत प्रकाशित.

पहिली भारतीय महिला अवकाशयात्री व अंतराळ संशोधन शास्त्रज्ञ म्हणून डॉ. कल्पना चावला यांचे नाव सर्वपरिचित आहे. त्यांच्या कर्तृत्वाची ओळख या पाठात करून दिली आहे.



सगळ्या ज़गाला सुन्न करणारी एक दुर्घटना १ फेब्रुवारी २००३ या दिवशी घडली.

'नासा' या अमेरिकेच्या अंतरिक्ष संशोधन केंद्राचे 'कोलंबिया' हे 'यान अंतराळातील संशोधनाची मोहीम पूर्ण करून पृथ्वीवर येण्यासाठी निघाले होते. अंतराळवीरांनी १६ दिवसांत विविध ८० शास्त्रीय प्रयोग यशस्वी केले होते. कर्तव्यपूर्तीचा आनंद प्रत्येकाच्या चेहऱ्यावर दिसत होता. आता काही मिनिटांतच यान पृथ्वीवर उतरणार होते, तेवढ्यात मोठा स्फोट झाला आणि हवेतच यानाचे तुकडे तुकडे झाले. सातही अंतराळवीरांचा दुर्दैवी अंत झाला. त्यांत एक भारतीय महिला शास्त्रज्ञ होती डॉ. कल्पना चावला.

दिल्लीजवळच्या कर्नाल नावाच्या खेड्यात १ जुलै १९६१ रोजी कल्पनाचा जन्म झाला. याच खेडेगावात तिने आपले प्राथमिक शिक्षण पूर्ण केले.

विद्यार्थिदशेत आपण अनेक स्वप्ने पाहतो. कल्पना चावलानेही असेच एक स्वप्न पाहिले होते, आकाशात भरारी मारण्याचे! याची चुणूक तिच्या शालेय जीवनातच दिसते. एकदा विज्ञानाच्या शिक्षकांनी वर्गातील सर्व मुलांना पर्यावरणासंबंधी प्रकल्प

## व्यक्तिचित्र

चित्रकार : जी. एस. ठाकूर

निसर्गातील रम्य देखावे, वृक्ष-वेली, फळे-फुले, पशुपक्षी आपल्या नानाविध रंगरेखांनी व आकारांनी चित्रकाराचे लक्ष वेधून घेतात. त्याचप्रमाणे स्त्री-पुरुषांची, मुला-मुलींची अनेक अवस्थांतील रंगरूपे हीदेखील चित्रकाराला मोह घालतात. व्यक्तिचित्रण हा चित्रकलेतील म्हणून एक महत्त्वाचा, जुनाच पण अवघड असा प्रकार आहे. छायाचित्रांप्रमाणे काही व्यक्तिचित्रे मुद्दाम चित्रकाराकडून काढून घेतली जातात. तथापि अनेक व्यक्तिचित्रे चित्रकार स्वयंस्फूर्तीने रेखाटतो. सोबतचे तिबेटी वृद्धेचे व्यक्तिचित्र जी. एस. ठाकूर या नामवंत चित्रकाराने स्वयंस्फूर्तीने काढलेले एक सुंदर भावचित्र आहे.

एका खऱ्याखुऱ्या तिबेटी आजीला पुढे बसवून हे व्यक्तिचित्र रेखाटलेले आहे. चेहरा हे मनुष्याचे सर्वांत उत्तम अंग. हुबेहूबपणाबरोबरच चेहऱ्यावरील व नजरेतील सूक्ष्म भावदर्शनाला व्यक्तिचित्रणात महत्त्व असते. या चित्रातील वृद्धा म्हातारपणाला साजेशा पोक्तपणाने कुणाकडे तरी बघत, कुणाचे तरी बोलणे लक्षपूर्वक ऐकत आहे. कुतूहलाने बघणे व ऐकत राहणे ही वार्धक्याची रीतच आहे. किंचित वाकून पुढे झुकलेल्या तिच्या बैठकीत ठाम आत्मविश्वास जाणवतो. तिच्या बारीक पिंगट डोळ्यांतील संथ कुतूहल; कमालीच्या सुरकुतलेल्या चेहऱ्यावरील मार्दव वार्धक्याचे एक निरागस मांगल्य प्रकट करून जाते. या वृद्धेच्या पेहेरावातील मोजके घटक म्हातारपणाच्या रंगरूपांना उठावदार करतात. हळुवार घड्या पडलेला डोक्यावरील मोरपंखी रंगाचा रुमाल, उजव्या कानावरील पांढरे केस आणि त्याखालील पांढऱ्या कर्णफुलाचा न डोलणारा डूल, डाव्या नाकपुडीतील किंचित दिसणारी नथणी, गळ्यातील काळीपांढरी मणिमाला, डाव्या हातातील रुपेरी कंकण, पिवळट छटांचा हिरवागार झगा हे सर्व चित्रघटक वृद्धेच्या अवस्थेचे व अंतरंगाचे वेधक दर्शन घडवतात. एक प्रकारची जगून झालेल्या जिण्याबद्दलची तृप्ती हीदेखील या वृद्धेच्या चित्रातून आपणास जाणवते. तिच्या झग्याचा हिरवा रंग या दृष्टीने सूचक वाटतो. तिबेटसारख्या अतिउंच प्रदेशात वयोमाने शरीरावर व चेहऱ्यावर दाट प्रमाणात सुरकुत्या पडतात, हेही लक्षात येते.

म्हणूनच हे व्यक्तिचित्र छायाचित्र वाटत नाही, तर रंगरेखांनी लिहिलेली एक भावकविता वाटते. हे अधिकाधिक बघत गेल्यास अधिकाधिक आनंद देत जाते.

— प्रा. रा. ग. जाधव

करायला सांगितला. कल्पनाने काय केले असेल असे तुम्हाला वाटते? तिने आकाशाचे एक मोठे चित्र काढले. त्यात ग्रह, तारे यांच्याबरोबरच आकाशात उडणारी विमाने, अवकाशयाने यांची चित्रे तिने काढली. हे चित्र म्हणजे जणू तिच्या स्वप्नाचे प्रतीकच होते.

लहानपणापासूनच ती साहसी होती. इतर मुलींप्रमाणे बाहुल्या घेऊन खेळत बसण्यापेक्षा सायकलवरून गावात वेगाने भटकायला तिला आवडे. सुटीच्या दिवशी मित्र-मैत्रिणींना एकत्र करून सायकलवरून सहलीला जाण्यात तिचा पुढाकार असे. शाळेत भरतनाट्यमबरोबर ती कराटेदेखील शिकली होती आणि खेळाप्रमाणेच तिला अभ्यासाचीही आवड होती.

आपल्याला पुढे कोण व्हायचे हे कल्पनाने लहानपणीच ठरवले होते. याची प्रचिती तिने जेव्हा महाविद्यालयात प्रवेश घेतला, तेव्हा आली. आपल्या मुलीने डॉक्टर किंवा प्राध्यापक व्हावे असे तिच्या आईवडिलांना वाटत होते; परंतु कल्पनाने ठामपणे सांगितले, की 'मला इंजिनीअरच व्हायचं आहे.' शेवटी आईवडिलांनी तिचे म्हणणे मान्य केले.

चंदिगडच्या अभियांत्रिकी महाविद्यालयात कल्पनाने प्रवेश घेतला. त्यावेळी अख्ख्या कॉलेजात सात मुली होत्या. त्याकाळी बहुधा मेकॅनिकल किंवा इलेक्ट्रिकल अभियांत्रिकीकडे सर्वांचा कल असे; परंतु "मला एरॉनॉटिक्स (विमान अभियांत्रिकी) हाच विषय शिकायचाय, नाहीतर मी परत जाणार." असं विभागप्रमुखांना कल्पनाने ठासून सांगितले. तिचा तो ठामपणा पाहून तिला एरॉनॉटिक्स हा विषय देण्यात आला. हा विषय घेणारी ती एकमेव मुलगी होती. इंजिनीअरिंगच्या शेवटच्या परीक्षेत ती पंजाब विद्यापीठात पहिली आली. 'एरॉनॉटिक्स' हा विषय घेण्याचा आपला निर्णय योग्यच होता, हे तिने सिद्ध केले.

आता कल्पनाला 'एरॉनॉटिक्स' या विषयातील प्रगत शिक्षणाचे वेध लागले. त्यासाठी तिने उच्च शिक्षण घेण्यासाठी अमेरिकेत जाण्याचा निर्णय घेतला. तिने स्वतः अनेक विद्यापीठांशी पत्रव्यवहार केला. खूप प्रयत्न केल्यानंतर कल्पनाला एका विद्यापीठात प्रवेश मिळाला. तिथेही एम.एस.च्या परीक्षेत प्रथम क्रमांक मिळवून तिने आपल्या यशाची परंपरा कायम राखली. नंतर एरोस्पेस इंजिनीअरिंग या विषयात तिने डॉक्टरेट मिळवली. त्यावेळी तिचे वय होते अवघे २७ वर्षांचे.

डॉक्टरेट पदवी मिळवल्यानंतर कल्पनाने अवकाशात जायच्या आपल्या प्रयत्नांची आखणी करायला सुरुवात केली. तिला सातत्याने खुणावणारे अंतराळ प्रवासाचे ध्येय आता जवळ आले होते. नासामध्ये प्रवेश मिळवण्यासाठी लागणारी पात्रता तिने जिद्दीने प्राप्त केली होती. कठीण चाचण्या दिल्यानंतर नासाने संशोधक म्हणून तिची निवड केली आणि नासामध्ये तिचे संशोधनकार्य सुरू झाले. विमानांना हवा असलेला विशिष्ट वेग कमीत कमी वेळात गाठणे या विषयावर तिने संशोधन केले. हे संशोधन इतके महत्त्वाचे होते, की अवकाशयानासंबंधी संशोधन करणाऱ्या 'ओव्हरसेट मेथडस इन कार्पोरेशन' या संस्थेच्या उपाध्यक्ष व संशोधक पदावर तिची नेमणूक झाली. इथे तिने अवकाशयानाच्या वेगासंबंधी संशोधन केले. हे संशोधन करत असताना आपले अवकाशयात्री बनण्याचे स्वप्न मात्र ती विसरली नव्हती.

आता अवकाशयात्री बनण्याचे कल्पनाचे स्वप्न तिच्या आवाक्यात आले होते. अर्थात हे स्वप्न सत्यात उतरवण्यासाठी तिने अपार परिश्रम केले होते, त्यामुळेच अवकाशयान विभागातून अवकाशयात्री विभागात प्रवेश मिळवण्यात ती यशस्वी झाली. दोन हजार उमेदवारांमधून तिची निवड झाली आणि ह्युस्टन येथे प्रशिक्षण घेण्यासाठी ती मार्च १९९५ मध्ये रुजू झाली. प्रशिक्षणानंतर कोलंबियाच्या अवकाश मोहिमेसाठी तिची निवड झाली. १९ नोव्हेंबर १९९७ रोजी 'कोलंबिया' यानाने अवकाशात झेप घेतली, तेव्हा कल्पनाला खूप आनंद झाला. १९ नोव्हेंबर ते ५ डिसेंबर १९९७ असे सोळा दिवस ती अंतराळात होती. तिचे अंतराळात भरारी मारण्याचे स्वप्न अखेर साकार झाले.

पहिली भारतीय महिला अवकाशयात्री म्हणून कल्पनाचे नाव सगळीकडे झाले. या तिच्या यशाबद्दल तिला विचारले असता ती म्हणाली, ''तुमच्या अंतर्मनात जागे ठेवलेले स्वप्न तुम्ही प्रयत्नाने सतत परिश्रम करून प्रत्यक्षात आणले, तर त्याची पूर्ती झाली ही एकच भावना मनात उरते. मी पहिली आहे, महिला अवकाशयात्री आहे ही गोष्ट माझ्या दृष्टीने तितकीशी महत्त्वाची नाही.''

यानंतर नासाने पुढच्या अंतराळ मोहिमेची आखणी केली, तेव्हा डॉ. कल्पना चावलाची मोहीम-विशेषतज्ज्ञ म्हणून नेमणूक करण्यात आली. १६ जानेवारी, २००३ या दिवशी कोलंबिया यान अवकाशात झेपावले. सोळा दिवसांची मोहीम पूर्ण करून यानाने परतीच्या प्रवासाला सुरुवात केली. आपण आता लवकरच पृथ्वीवर

पोहोचणार याच आनंदात सर्वजण होते; परंतु नियोजित वेळेच्या आधी १६ मिनिटे कोलंबिया यानाचा ह्युस्टन येथील नियंत्रणकक्षाशी संपर्क तुटला. यावेळी कोलंबिया यान जमिनीपासून फक्त ६० कि. मीटर उंचींच्या अंतरावर होते; परंतु यानात तांत्रिक बिघाड झाला आणि कोलंबिया यान हवेतच जळून नष्ट झाले. सातही अवकाशयात्रींचा अंत झाला. सगळे जग हळहळले.

अवकाशात भरारी मारण्याचे एक स्वप्न कल्पनाने पाहिले, तसेच ते स्वप्न प्रत्यक्षात आले हेदेखील तिने पाहिले. एकदा तिने असे सांगितले होते, 'स्व ... कडून सत्याकडे जाणारा मार्ग अस्तित्वात आहे. फक्त ती शोधायची दृष्टी आणि धैर्य तुमच्या अंगी असायला हवे.' तिने जे सांगितले ते करूनही दाखवले.

अवघ्या ४२ वर्षांच्या आयुष्यामध्ये कर्तृत्वाचे उत्तुंग शिखर गाठणारी आकाशकन्या कल्पना हाच संदेश देत राहील, की कर्तृत्वाची झेप आकाशाच्या पलिकडेही असू शकते!

**टीपा :**
**नासा** - नॅशनल एरॉनॉटिक्स ॲन्ड स्पेस ॲडमिनिस्ट्रेशन नावाची अंतराळ संशोधन करणारी संस्था. **चुणूक** - थोडासा नमुना. **एम.एस.** - मास्टर ऑफ सायन्स.

**प्रश्न :**

खालील प्रश्नांची थोडक्यात उत्तरे लिहा.

१. शालेय जीवनात कल्पना चावलाच्या अंगी कोणकोणते गुण दिसून येतात ?
२. कल्पनाचा निश्चयी स्वभाव कोणत्या प्रसंगातून दिसून येतो ?
३. विद्यार्थिदशेत कल्पनाने कोणते स्वप्न पाहिले व ते पूर्ण करण्यासाठी तिने काय काय केले ?
४. कल्पना चावलाच्या मते स्वप्नाकडून सत्याकडे जाण्यासाठी आपल्या अंगी कोणते गुण असले पाहिजेत ?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. 'असाध्य ते साध्य करिता सायास। कारण अभ्यास। तुका म्हणे' ही उक्ती कल्पना चावलाच्या बाबतीत कशी सार्थ आहे, हे या पाठाच्या आधारे लिहा.
२. कल्पना चावलाच्या संदर्भात वृत्तपत्रातील कात्रणे जमवा आणि जमवलेल्या सर्व कात्रणांचे प्रदर्शन तिच्या जन्मदिवशी भरवा.



# २०. विचारधन

## १. विद्यार्थी आणि पंचतत्त्व

ज्याप्रमाणे मनुष्यप्राण्याला अन्नाची जरुरी आहे, त्याप्रमाणे सर्वांना विद्येची जरुरी आहे. विद्या ही दुधारी तलवारीसारखी असते. विद्येने दुष्टांचा संहार करता येतो व दुष्टांपासून रक्षणही करता येते.



माझ्या मते केवळ विद्याच पवित्र असू शकत नाही. प्रज्ञा म्हणजे शहाणपणा, शील म्हणजे सदाचरणयुक्त असं आचरण, करुणा म्हणजे सर्व मानवजातीसंबंधी प्रेमभाव

आणि मैत्री म्हणजे सर्व प्राणिमात्रांविषयीची आत्मीयता. विद्येबरोबर या चार पारमिता असल्या पाहिजेत, तरच विद्वत्तेचा काही उपयोग आहे. विद्येबरोबर मानवाजवळ करुणा नसली तर तो दानव आहे, असं मी समजतो.

विद्या, प्रज्ञा, करुणा, शील आणि मैत्री या पंचतत्त्वानुसार प्रत्येक विद्यार्थ्याने आपले चारित्र्य बनवले पाहिजे आणि या मार्गाने एकट्यानेच जावे लागले, तरी मनोधैर्य व निष्ठा राखून गेले पाहिजे. 'महाजनो येन गतः स पन्थः' ही परप्रत्ययेन बुद्धी सोडून विवेकाने, जो मार्ग आपणांस योग्य वाटेल त्याच मार्गाने पुढे गेले पाहिजे.

**- डॉ. बाबासाहेब आंबेडकर**

### २. यंत्र आणि माणूस

यंत्राचे कर्तृत्व पाहिले, की मनुष्याचे मन थक्क होते खरे; पण हे कर्तृत्व दाखवणारी यंत्रे निर्माण करण्याचे सामर्थ्य फक्त माणसात आहे, हे पुष्कळदा आपण विसरतो; म्हणून यांत्रिक युगाचे भव्य रूप पाहिले किंवा त्यात क्षणाक्षणाला होणारी माणसाची धावपळ पाहिली, की मनुष्य सहज विचारतो, ''ह्यात माणसाचे स्थान कोणते ?''

माणसाचे स्थान सर्वांत महत्त्वाचे आहे. आपल्या भोवताली जे काही दिसते ते माणसाने निर्माण केले आहे. निसर्गाने जे दिले ते माणसाच्या हातांनी सुंदर सुंदर केले. निसर्गाने दिलेल्या काळ्या जमिनीत माणसाने भरघोस पिके काढली. निसर्गाने दिलेल्या पाण्याच्या प्रवाहाचे मोठाले तलाव बांधले किंवा त्या पाण्यापासून वीज निर्माण केली. निसर्गाने दिलेल्या काळ्या खडकातून मन मोहून टाकणारी सुंदर, कोरीव लेणी खोदून काढली. जन्मभर कारखाने चालवून मला जर सर्वांत महत्त्वाचे तत्त्व काही पटले असेल, तर ते म्हणजे कुठल्याही कार्यात माणसाइतका महत्त्वाचा दुसरा घटक नसतो.

हे तत्त्व साधे आहे; पण त्याचा अर्थ समजला तर ते दुधारी तरवारीसारखे कापत जाते. या तत्त्वाचा निकष लावला, तर एक सत्य स्वीकारावे लागते. ते सत्य हे, की आमच्या व्यक्तिगत व राष्ट्रीय जीवनाचे यशापयश हे आमच्या माणसाचे यशापयश आहे.

मी स्वतः तर अपयश हे व्यवहारी जीवनाचा एक भाग म्हणून पत्करायला तयार असतो. धंद्यात मी बरेच उन्हाळे-पावसाळे पाहिले आहेत. त्यात मी कधी उन्हाने भाजून निघालो आहे, तर कधी पावसाने ओलाचिंब झालो आहे. यश-अपयश दोन्हीही सारख्याच शांत वृत्तीने स्वीकारायला आयुष्यातल्या उन्हाळ्यांची व पावसाळ्यांची

सवय करून घ्यावी लागते. मी ती घेतली आहे; पण ती सवय करून घेताना माझे डोळे उघडे ठेवले होते आणि त्या डोळ्यांनी टिपलेले जगाचे बदलते रूप मी आत्मसात करत गेलो. हे माझ्या जीवनाचे गमक आहे.

**- शंतनुराव किर्लोस्कर**

## ३. अहिंसा

अहिंसा या शब्दाचा खरा गर्भितार्थ शोधणे आपल्याला भाग पडते. अंधार म्हणजे प्रकाशाचा अभाव असतो, प्रकाश म्हणजे अंधाराचा अभाव नसतो; कारण प्रकाश ही प्रकृती आहे, अंधार ही विकृती. त्याप्रमाणे अहिंसा ही मानवतेची प्रकृती आहे. हिंसा ही विकृती आहे. विवेकाचा, सामंजस्याचा व सोशिकतेचा अस्त झाला, की हिंसेची नखे बाहेर पडतात. याचा अर्थ ती निरुपायाने व अपघाताने क्वचित होणारी घटना आहे. बुद्धीला व हृदयाला आवाहन पोचेनासे झाले,तरच हिंसेचा उदय होतो. कृती ही हिंसेची भाषा आहे, तर प्रीती ही अहिंसेची भाषा आहे. प्रीतीच्या भाषेसाठी लिपी वा शब्द आवश्यक नसतात. मौनातूनही तिचा संवाद होऊ शकतो. याउलट आरोळ्या, किंकाळ्या व गदारोळाशिवाय हिंसेची स्वारीच सफल होत नाही. हिंसेजवळ शौर्य व धैर्य असावे लागते. शरीरसामर्थ्य व मनोबलही आवश्यक असते. शस्त्रांचे साह्य व ते चालवण्याचे नैपुण्यही अपेक्षित असते; त्यामुळे हिंसेचा मार्ग हा मर्दांचा मार्ग मानला जातो. ओघानेच अहिंसेचा मार्ग हा निष्क्रियांचा व नामर्दांचा म्हणून सतत हेटाळला जातो; पण सूक्ष्म दृष्टीने पाहिले तर हिंसेचा जन्मच मुळी मानसिक दुर्बलतेच्या पोटी संभवत असल्याचे लक्षात येईल. काही बाबी समजून घेता येईनाशा झाल्या वा जेमतेम समजल्यावर सहन करता येईनाशा झाल्या, कशाबशा सहन करता आल्या, क्षम्य मानता न आल्या,तरच हिंसेचा उद्रेक होतो. मन पुरेसे सशक्त असेल,तर हिंसेचा आश्रय घ्यावा लागण्याची अगतिकता पत्करण्याचे कारण नाही; त्यामुळेच अहिंसा स्वाभाविक तर हिंसा अस्वाभाविक मानावी लागते.

**- राम शेवाळकर**



# १. सर्वात्मका शिवसुंदरा

**कुसुमाग्रज (विष्णु वामन शिरवाडकर - १९१२ - १९९९)**

नाटककार आणि तेजस्वी आशयाची कविता लिहिणारे कवी. 'जीवनलहरी', 'विशाखा', 'हिमरेषा', 'वादळवेल', 'मराठी माती', 'किनारा' इत्यादी कवितासंग्रह; 'नटसम्राट', 'वीज म्हणाली धरतीला', 'ययाती आणि देवयानी' इत्यादी नाटके; 'वैष्णव', 'जान्हवी' इत्यादी कादंबऱ्या ही त्यांची प्रसिद्ध पुस्तके आहेत. ज्ञानपीठ पुरस्कार मिळवणारे हे मराठीतील दुसरे साहित्यिक आहेत. ही कविता 'किशोर' दिवाळी अंक - १९७५ मधून घेतली आहे.

---

सर्वात्मका शिवसुंदरा स्वीकार या अभिवादना ।
तिमिरातुनी तेजाकडे प्रभु आमुच्या ने जीवना ॥
सुमनात तू गगनात तू
ताऱ्यामधे फुलतोस तू
सद्धर्म जे जगतामधे
सर्वांत त्या वसतोस तू



चोहीकडे रूपे तुझी जाणीव ही माझ्या मना ॥
श्रमतोस तू शेतामधे
तू राबसी  कासवे
जे रंजले वा गांजले
पुसतोस त्यांची आसवे
स्वार्थाविना सेवा जिथे तिथे तुझे पद पावना ॥
न्यायार्थ जे लढती रणी
तलवार तू त्यांच्या करी
ध्येयार्थ जे तमि चालती
तू दीप त्यांच्या अंतरी
ज्ञानार्थ जे तपती मुनी होतोस त्यांची साधना ॥
करुणाकरा करुणा तुझी
असता मला भय कोठले
मार्गावरी पुढती सदा
पाहीन मी तव पावले
सुजनत्व या हृदयामधे नित वागवी भीतीविना ॥

**प्रश्न :**

अ. खालील प्रश्नांची प्रत्येकी चार ते पाच वाक्यांत उत्तरे लिहा.

१. कवीने कोणाला अभिवादन केले आहे ? त्याच्यापाशी काय मागितले आहे ? त्यातून कवीच्या मनातील कोणता भाव कळून येतो ?
२. कवीला परमेश्वराची रूपे कोणाकोणातून आढळून येतात ?
३. शेतकरी, श्रमिक, रंजले-गांजलेले यांच्याबाबत या परमेश्वराची वागणूक कोणत्या प्रकारची असते ?
४. न्यायार्थ, ध्येयार्थ व ज्ञानार्थ झटणाऱ्यांना कवीचा परमेश्वर कोणत्या प्रकारे साह्य करतो ?
५. परमेश्वराकडे कवी कोणत्या भावनेने पाहात आहे ? त्याच्यापाशी कोणती मागणी करत आहे ?

आ. खालील प्रश्नांची प्रत्येकी एक ते दोन वाक्यांत उत्तरे लिहा.

१. 'सर्वात्मका शिवसुंदरा' असे कवीने कोणाला उद्देशून म्हटले आहे ?

२. 'तिमिरातून तेजाकडे जाणे' म्हणजे काय ?

३. परमेश्वराबद्दलची कोणती जाणीव कवीच्या मनाला झालेली आहे ?

इ. खालील चरणांचा अर्थ थोडक्यात स्पष्ट करा.

१. 'स्वार्थाविना सेवा जिथे तिथे तुझे पद पावना ।'

२. 'ज्ञानार्थ जे तपती मुनी होतोस त्यांची साधना ।'

३. 'सुजनत्व या हृदयामधे नित वागवी भीतीविना ।'

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. जे का रंजले गांजले, त्यांसी म्हणे जो आपुले ।
तोचि साधु ओळखावा, देव तेथेचि जाणावा ॥
या चरणातील कल्पनेचा विस्तार करा.

२. महात्मा गांधी आणि स्वामी विवेकानंद यांनी परमेश्वर कशात पाहिला ते समजावून घ्या.

**व्याकरण :**

## अलंकार

अलंकार म्हणजे भूषणे, दागिने. शरीर शोभायमान दिसण्यासाठी अंगावर दागिने घालतात. शरीराची शोभा दागिने अधिक खुलवतात. आपली भाषा सुंदर व्हावी; म्हणून भाषेतही भूषणांचा, अलंकारांचा उपयोग कवी आणि लेखक करत असतात. विशेषत: पद्यात अलंकार अधिक शोभून दिसतात. गद्यसुद्‌धा अलंकारांनी सुंदर दिसते. 'मुख सुंदर दिसते' किंवा 'मुख सुंदर आहे' ही साधी (गद्य) वाक्ये झाली; परंतु 'मुख कमलासारखे सुंदर आहे' किंवा 'मुख जणू कमलच आहे' असे म्हटले तर ते अधिक सुंदर दिसते. त्यालाच आलंकारिक भाषा म्हणतात. आलंकारिक भाषण किंवा आलंकारिक लेखन सर्वांना आवडते. त्यात एक प्रकारची चमत्कृती दिसते व मन आनंदित होते. भाषेत हा असा चमत्कार दोन प्रकारांनी आणता येतो. शब्दचमत्कृतीने आणि अर्थचमत्कृतीने.

जसे — बीजा हवी निगराणी, हवी मायेची पाखर ।
लख्ख प्रकाश निर्मळ, त्यात कष्टाचा पाझर ॥

या पद्य चरणांतील शब्दांच्या योजनेमुळे ते चरण वरचेवर गुणगुणावेसे वाटतात. त्यात नादमाधुर्य असल्यामुळे ते गेय म्हणजे गाण्यास योग्य झालेले आहेत. शब्द-

चमत्कृतीप्रमाणेच या चरणांमध्ये अर्थचमत्कृतीसुद्धा आहेच. बियांतून अंकुर बाहेर येण्यासाठी काय हवे असते, हे कवीने किती सुंदर शब्दांत सांगितले आहे ! दोन्ही चरणांच्या शेवटचे शब्द पाखर आणि पाझर या पंक्तींमध्ये नादमाधुर्य आणण्यासाठी कवीने योजलेले आहेत.

पद्यामध्ये शब्दांची किंवा अक्षरांची पुनरुक्ती असली, की त्यामध्ये नादमाधुर्य येते. अशा शब्दचमत्कृतीची पद्यात योजना असली तर त्या पद्यात 'शब्दालंकार' असतो. पद्यात अर्थचमत्कृती प्रामुख्याने असली तर त्या पद्यात 'अर्थालंकार' असतो.

अलंकारांचे 'शब्दालंकार' आणि 'अर्थालंकार' असे दोन मुख्य प्रकार आहेत.





# २. या हो सूर्यनारायणा !

**इंदिरा संत (इंदिरा नारायण संत - १९१४-२०००)**

स्त्रीमनाचा हळुवारपणा व्यक्त करणाऱ्या कवयित्री. 'शेला', 'मेंदी', 'मृगजळ', 'रंगबावरी' इत्यादी कवितासंग्रह; 'श्यामली', 'कदली' आणि 'चैतू' हे कथासंग्रह प्रसिद्ध आहेत. ही कविता 'मनन करा भाषेचे-२' या पुस्तकातून घेतली आहे.

या कवितेत सर्वांचे जीवन उजळवणाऱ्या सूर्याला आपल्या घरी येण्याचे आवाहन कवयित्रीने केले आहे.

---

या हो सूर्यनारायणा !
या हो या लौकर
सोन्याच्या पावलांनी
भूषवा हे घर.

अंगण सारवीले
रेखिले स्वस्तीक
हळदीकुंकवानी
मंगलसूचक

उघडी दालने ही
स्वागता आतुर
या हो सूर्यनारायणा !
या हो या लौकर.

आकाशाच्या मध्यभागी
आलात भास्करा,
तेजाच्या वर्षावात
झगमगे धरा.





येऊ देत माझ्या घरी
किरणांचे झोत
तेजस्वी पित्याचे ते
वात्सल्याचे हात

उघडी तावदाने
झरोके कौलारी
रेंगाळोत घरामाजी
किरणे रुपेरी



सोन्याच्या वेशीतून
निरोप घेताना
या हो या अंगणात
सूर्यनारायणा !

आईच्या मायेहून
कोमल करांनी
गोंजारा बालकांना
खेळती अंगणी

रंगवा तावदान
शिणले अंतर
गुलाबी आनंदात
न्हाऊ दे संसार.

**प्रश्न :**

अ. खालील प्रश्नांची उत्तरे प्रत्येकी तीन ते चार वाक्यांत लिहा.

१. सूर्यनारायणाने आपल्या घरी यावे, म्हणून कवयित्रीने कोणती तयारी केली आहे ?

२. आकाशात मध्यभागी सूर्यनारायण आल्यावर कवयित्रीने त्यांच्यापाशी कोणत्या मागण्या केल्या आहेत ?

३. बालके आणि संसार यांबाबत सूर्यनारायणाकडून कोणती अपेक्षा कवयित्रीने बाळगली आहे ?

आ. खालील प्रश्नांची थोडक्यात उत्तरे सांगा.

१. सूर्यकिरणांच्या झोतांना 'तेजस्वी पित्याचे वात्सल्याचे हात' असे का म्हटले आहे ?

२. सोन्याची पावले, सोन्याची वेस, गुलाबी आनंद म्हणजे काय ?

३. या कवितेतील कोणते कडवे तुम्हांला विशेष आवडले ? का ?

इ. खालील कडव्याचा अर्थ अधिक स्पष्ट करा.

आकाशाच्या मध्यभागी
आलात भास्करा
तेजाच्या वर्षावात
झगमगे धरा.

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. कवयित्रीच्या मागणीप्रमाणे सूर्यनारायण खरोखरच तिच्या घरी आले, अशी कल्पना करून, त्या दोघांत घडलेला संवाद पंधरा ते वीस वाक्यांत लिहा.

२. 'या हो या, चंद्रदेवा' या शीर्षकावरून तुम्हांला सुचलेल्या विचारांची नोंद करा.

**व्याकरण :**

**शब्दालंकार - यमक**

शब्दालंकाराचे अनेक प्रकार आहेत-त्यांत 'यमक' हा अलंकार महत्त्वाचा आहे. एखादा शब्द किंवा अक्षर पुनःपुन्हा पद्यात चरणान्ती आले, की तेथे 'यमक' हा अलंकार होतो.

जसे — १. मना चंदनाचे परी त्वां **झिजावे** ।
परी अंतरी सज्जना **नीववावे** ॥

२. तनू त्यागिता कीर्ति मागे **उरावी** ।
मना सज्जना हेचि क्रीया **धरावी** ॥

३. या वैभवाला तुझ्या पाहुनिया, मला स्फूर्ति नृत्यार्थ **होते जरी** ।
सामर्थ्य नामी तुझ्या जन्मभूमी, तसे पाहिले मी न **कोठे तरी** ॥

अशा शब्दांनी नादमाधुर्य निर्माण झालेल्या पद्यपंक्ती तुमच्या पाठ्यपुस्तकातील कवितांतून निवडून काढा.



# ३. पाणपोई

**यशवंत (यशवंत दिनकर पेंढरकर - १८९९-१९८५)**

रविकिरण मंडळातील प्रमुख कवी. 'यशोधन', 'यशोगंध', 'यशोनिधी' इत्यादी कवितासंग्रह; 'बंदिशाळा' 'जयमंगला' ही खंडकाव्ये; 'छत्रपती शिवराज' हे महाकाव्य; 'मोतीबाग' हा बालगीतसंग्रह ही त्यांची प्रसिद्ध पुस्तके आहेत. भारत सरकारने 'पद्मभूषण' ही पदवी देऊन त्यांचा गौरव केला आहे.

ही कविता 'पाणपोई' या कवितासंग्रहातून घेतली आहे.

सर्व रसिकांसाठी खुल्या केलेल्या काव्यरूपी 'पाणपोई'चे वर्णन कवितेत केले आहे.

---

येई भाई, येथ पाही, घातली ही पाणपोई
धर्मजाती कोणती ती भेद ऐसा येथ नाही
संसृतीचा हा उन्हाळा तल्खली होई जिवाची
स्वेदबिंदू अश्रुधारा याविना पाणीच नाही १

वायुवीची भोवती आंदोलुनी त्या वंचिताती
झोंबती अंगी झळा अन् मूर्छना ये ठायिठायी
सावली नाही कुठेही, तापतो मार्तंड डोई
श्रांत पांथा ! बांधली ही तुझियासाठी सराई २

आद्य जे कोणी कवी तत्स्फूर्तिच्या ज्या सिंधु गंगा
आणिल्या वाहून खांदी कावडी त्यांतील काही
पांथसेवासाधनी हे व्हावयाते गार पाणी
मृत्तिकेचे मात्र माझे कुंभ, ही माझी नवाई ३

ओंजळी, दो ओंजळी, आकंठ किंवा घे पिऊनी
हो जरा ताजातवाना, येऊ दे सामर्थ्य पायी
पावता तृप्ती मना, संचारता अंगी उमेदी
जो दुवा देशील पांथा तेवढी माझी कमाई ४

**प्रश्न :**

खालील प्रश्नांची प्रत्येकी पाच ते सहा वाक्यांत उत्तरे लिहा.

१. कवीने कोणत्या प्रकारची 'पाणपोई' घातलेली आहे ? तिचे वैशिष्ट्य कोणते ?
२. कवीने आपली ही पाणपोई विशेषकरून कोणासाठी घातलेली आहे ?
३. कवीने या पाणपोईतील आपली 'नवाई' कोणत्या शब्दांत सांगितली आहे ?
४. कवी आपली 'कमाई' कोणती मानतो ?
५. कवीने आपल्या काव्यास 'पाणपोई' का म्हटले असेल ?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. 'आद्य जे कोणी कवी तत्स्फूर्तिच्या ज्या सिंधु गंगा
आणिल्या वाहून खांदी कावडी त्यांतील काही'
असे कवीने म्हटले आहे. हे 'आद्य कवी' कोण ? त्यांच्या 'सिंधु गंगा' कोणत्या ? एक-दोन उदाहरणे देऊन त्यांच्यासंबंधीची माहिती एक-दोन वाक्यांत सांगा.
२. खालील शब्द शुद्ध रूपात लिहा. त्यांचा अर्थ शब्दकोशातून माहीत करून घ्या.
संसृति, तल्खली, वायुवीची, मूर्छना, मार्तंड, तत्स्फूर्ती, पांथसेवासाधन.
३. प्रत्यक्षातील पाणपोई आणि कवीची ही 'पाणपोई' यांतील साम्यभेदांची नोंद करा.
४. कविवर्य यशवंत यांचा 'पाणपोई' हा कवितासंग्रह मिळवून त्यातील काही कविता वाचा. त्यातील तुम्हांला आवडलेल्या पाच-सहा कविता तुमच्या वहीत उतरवून घ्या.

**व्याकरण :**

**अर्थालंकार**

दोन सुंदर वस्तूंमधील साम्य दर्शवून पद्यामध्ये अर्थचमत्कृती आणली जाते, तेथे अर्थालंकार होतो. बहुतेक अर्थालंकार अशा साम्यावर आधारित असतात. त्यात चार गोष्टी महत्त्वाच्या असतात.

१. ज्या गोष्टीचे वर्णन कवी करत असतो, तिला अलंकारात 'उपमेय' असे म्हणतात.

'मुख कमलासारखे सुंदर आहे' या वाक्यामध्ये मुखाचे वर्णन कवी करत आहे. म्हणून 'मुख' हे 'उपमेय' आहे.

२. उपमेयाचे साम्य ज्या दुसऱ्या गोष्टीशी कवी दाखवतात, तिला 'उपमान' असे म्हणतात.

वरील वाक्यात मुखाचे साम्य कमलाशी दाखवले आहे, म्हणून 'कमल' हे इथे 'उपमान' आहे.

३. उपमेय आणि उपमान यांमधील साम्य दर्शवणाऱ्या गुणधर्माला 'साधर्म्य' किंवा 'समानधर्म' असे म्हणतात.

वरील वाक्यात उपमेय 'मुख' आणि उपमान 'कमळ' यांमध्ये साम्य दाखवणारा गुण सुंदरता हा आहे.

४. उपमेय आणि उपमान यांमधील साम्य दर्शवणाऱ्या शब्दाला 'साधर्म्यसूचक शब्द' किंवा 'साम्यसूचक शब्द' म्हणतात.

वरील वाक्यात 'कमलासारखे मुख' यातील 'सारखे' हा 'साधर्म्यसूचक शब्द' आहे.





# ४. आला आश्विन आश्विन

**विजया संगवई (विजया व्यंकटेश संगवई - जन्म : १९४०)**

नव्या पिढीतील कवयित्री. 'अरूपाची गंधगीते' व 'ओंजळ' हे कवितासंग्रह; 'गंधबावरी' हा कथासंग्रह; 'प्रिया' ही कादंबरी इत्यादी त्यांची प्रसिद्ध पुस्तके आहेत. ही कविता 'अरूपाची गंधगीते' या काव्यसंग्रहातून घेतली आहे.

या कवितेत धनधान्यांनी समृद्धी आणणाऱ्या आश्विनातील निसर्गाचे वर्णन कवयित्रीने केले आहे.

---



आला आश्विन आश्विन
मऊ धुकं पांघरून
साज दवाचे लेवून
उन्हं केशरी पिऊन



आला आश्विन आश्विन
तरारली रानं वनं
ब्रहरली उपवनं
रंग-गंधांत न्हाऊन



आला आश्विन आश्विन
तृप्त झुळुझुळु गाणं
गंधगार रुणझुण
मुक्त किलबिल तान

आला आश्विन आश्विन
शेतामधी झुले सोनं
मन आले भरून
दारी झेंडूंची तोरणं



आला आश्विन आश्विन
स्निग्ध दुधाळ चांदिणं
अमृताचे ढाळी कण
नभ कोंदे नक्षत्रानं



आला आश्विन आश्विन
जाती सीमा उल्लंघून
लुटा समतेचं सोनं
गात मानव्याचं गाणं

**प्रश्न :**

अ. खालील प्रश्नांची उत्तरे प्रत्येकी सात ते आठ वाक्यांत लिहा.

१. आश्विन महिन्यातील निसर्गाचे वर्णन या कवितेत कोणत्या प्रकारे करण्यात आलेले आहे ?

२. आश्विन महिन्यात धान्याची समृद्धी असते, हे कवयित्रीने कोणत्या प्रकारे सांगितले आहे ?

३. कोणता महत्त्वाचा संदेश या कवितेतून देण्यात आला आहे ?

४. 'मानव्याचे गाणे' म्हणजे काय ?

आ. खालील चरणांचा अर्थ स्पष्ट करा.

१. 'बहरली उपवनं, रंग-गंधांत न्हाऊन.'

२. 'स्निग्ध दुधाळ चांदिणं, अमृताचे ढाळी कण.'

इ. या कवितेतील तुम्हांला आवडलेल्या ओळी लिहा आणि त्या का आवडल्या ते सांगा.

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. चैत्र आणि श्रावण महिन्यांतील निसर्गाचे वर्णन प्रत्येकी दहा वाक्यांत करा.

२. बालकवींची 'श्रावणमास' ही कविता मिळवून वाचा.

३. 'आश्विन महिन्यातील एक सकाळ' या विषयावर एक वर्णनात्मक परिच्छेद लिहा.

**व्याकरण :**

**अर्थालंकार — उपमा**

उपमेय हे उपमानासारखेच आहे, असे जेथे वर्णन असते, तेथे 'उपमा' हा अलंकार असतो.

उपमा अलंकारात सम, समान, सारखे, वाणी, जसे, तसे, प्रमाण, सदृश, परी, तुल्य यांपैकी एखादा साधर्म्यसूचक शब्द असतो.

१. लाट उसळोनी जळी खळे व्हावे,
त्यात चंद्राचे चांदणे पडावे,
तसे गाली हासता तुझ्या व्हावे,
उचंबळुनी लावण्य वर वहावे ॥

२. दावी न गर्व विभवें, गुण घे पराचे ।
खड्‌गाग्र-तुल्य विषम-व्रत हे भल्याचे ॥

वर दिलेल्या उदाहरणांतील उपमेय, उपमान, समान धर्म आणि साम्यसूचक शब्द कोणते ते सांगा.





# ५. मराठबाणा

**माधव ज्यूलियन (माधव त्रिंबक पटवर्धन - १८९४-१९३९)**

खंडकाव्य, गज़्जल, सुनीत, रुबाया इत्यादी विविध काव्यप्रकारांत लेखन करणारे कवी. 'विरहतरंग', 'सुधारक', 'नकुलालंकार' ही खंडकाव्ये; 'स्वप्नरंजन', 'मधुलहरी' हे कवितासंग्रह; 'फार्शी-मराठी कोश', 'छंदोरचना', 'भाषाशुद्धिविवेक' इत्यादी गद्य ग्रंथ प्रसिद्ध आहेत. 'छंदोरचना' या ग्रंथाबद्दल मुंबई विद्यापीठाची डी.लिट. ही पदवी प्राप्त.
ही कविता 'आठवणीतल्या कविता' भाग-१ मधून घेतली आहे.

महाराष्ट्रभूमीची वैशिष्ट्ये आणि मराठी भाषेचा गुणगौरव या कवितेतून केला आहे.

महासिंधु याला असे पाठिराखा, तसे साह्य सह्याचलाचे कडे,
खडे दुर्ग साल्हेर, फोंडा, परांडा, अशेरी असे दक्ष चोहीकडे,
महाराष्ट्र हा कृष्णपाषाणदेही, परी लोहपाणीहि अंगात या,
नद्या न्हाणिती तापि, कृष्णा नि गोदा, भिमा, मांजरा, वैनगंगा तया

महात्मा खरा जो स्वधर्माभिमानी परी धर्मवेडास थारा न दे,
समत्वे गुणग्राहकत्वेच योजी स्वकीयांस जो राष्ट्रकार्यामधे,
सदा वंद्य जो क्षात्रकर्मप्रणेता महाराष्ट्रसम्राट शिवाजी प्रभू
तया पूज्य ती पूज्य तत्सेवकाला न का संतमाता महाराष्ट्रभू ?

जिचा 'अमृतातेहि जिंकील पैजा' असा बोल ये प्रत्ययाचा निका,
पहा भिन्नजातीय पुष्पाकराही दिसे गालिचा की हिची वाटिका,
मराठी अशी ज्ञानदेवी जयाची असे मायबोली मराठीच तो,
हृदी रक्त दे साक्ष तो बंधु माझा, कुठेही असो उच्च वा नीच तो

मराठीस अन्याय कोठेहि झाला, स्वदेशी, विदेशी कुणी गांजिले
मराठी कसा मी न संताप माझा धडाडे जरी तीव्र दुःखानिले ?

**प्रश्न :**

अ. खालील प्रश्नांची उत्तरे प्रत्येकी चार ते पाच वाक्यांत लिहा.

१. महाराष्ट्रभूमीची कोणती ठळक भौगोलिक वैशिष्ट्ये या कवितेत सांगितलेली आहेत ?

२. छत्रपती शिवाजीमहाराजांचा गुणगौरव कवीने कोणत्या शब्दांत केला आहे ?
३. महाराष्ट्राला 'संतमाता महाराष्ट्रभू' असे का म्हटले आहे ? सोदाहरण स्पष्ट करा.
४. मराठी प्रदेशाचा आणि माणसाचा गुणगौरव करताना कवीने कोणत्या विशेष बाबी नमूद केल्या आहेत ?
५. मराठीवरील अन्याय कवीला सहन होणे शक्य नाही, हे आपणांस कशावरून दिसून येते ?

आ. खालील चरणांचा अर्थ स्पष्ट करा.
१. महाराष्ट्र हा कृष्णपाषाणदेही, परी लोहपाणीहि अंगात या
२. जिचा 'अमृतातेहि जिंकील पैजा' असा बोल ये प्रत्ययाचा निका
३. मराठी अशी ज्ञानदेवी जयाची असे मायबोली मराठीच तो

इ. खालील शब्दांची फोड करून त्यांचा अर्थ लिहा.
सह्याचल, कृष्णपाषाणदेही, स्वधर्माभिमानी, क्षात्रकर्मप्रणेता, दु:खानिल.

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. 'मराठी असे आमुची मायबोली' या विषयावर भाषण करायचे आहे असे समजून टाचण तयार करा.
२. गोविंदाग्रज यांचे 'महाराष्ट्र गीत' वाचा, पाठ करून चालीवर म्हणा.
३. तुम्हांला आठवणाऱ्या महाराष्ट्राच्या गुणवैशिष्ट्यांची यादी तयार करा. तुमची यादी इतरांच्या यादीशी ताडून पाहा. जरूर तेथे बदल करून यादी पक्की करा.

**व्याकरण :**

**अर्थालंकार - उत्प्रेक्षा**

उपमेय जणू उपमानच आहे असे जेथे वर्णन असते, तेथे 'उत्प्रेक्षा' हा अलंकार असतो.

उत्प्रेक्षा अलंकारात जणू, जणूकाही, जणूकाय, की, गमे, वाटे, भासे, म्हणजे यांपैकी एखादा साधर्म्यसूचक शब्द असतो.

१. विद्या हे पुरुषास रूप बरवे, की झाकले द्रव्यही ।
२. तिच्या कळ्या । होत्या मिटलेल्या सगळ्या ।
जणु दमल्या । फार खेळुनी, मग निजल्या ॥

वरील उदाहरणांमधील उपमेय, उपमान, समान धर्म आणि साम्यसूचक शब्द ओळखा.



## ६. पाळीव पोपटास

**काव्यविहारी (धोंडो वासुदेव गद्रे - १८८४-१९७५)**

जुन्या पिढीतील कवी. 'काव्यविहार', 'स्फूर्तिलहरी' व 'स्फूर्तिनिनाद' हे कवितासंग्रह प्रसिद्ध. काव्यविहारी यांनी आपले विचार आवेशपूर्ण भाषेत मांडलेले आहेत.

ही कविता 'आठवणीतल्या कविता' (भाग ३) या पुस्तकातून घेतली आहे.

डाळिंबाच्या दाण्याला भुलून स्वत:चे स्वातंत्र्य गमवणाऱ्या पोपटाच्या नादान वृत्तीचे वर्णन या कवितेत आले आहे.

---

हे डाळिंबाचे दाणे वेड्या । घात तुझा करिती

कवटी तू कवठावरली
फोडिलीस एका काळी
ती चोच आज बोथटली
करितोस गुजारा धनी टाकितो त्या तुकड्यावरती ॥ १ ॥

चैनीत घेत गिरक्यांसी
स्वच्छंदे वनि फिरलासी
गगनात स्वैर उडलासी
ते स्वातंत्र्याचे दिन सोन्याचे आठव तू चित्ती ॥ २ ॥

चाहिल ते झाड बघावे
त्यावरी स्वैर उतरावे
फळ दिसेल ते फोडावे
मग उडुनी जावे खुशाल, असली तेव्हाची रीती ॥ ३ ॥



पूर्वीची हिंमत गेली
स्वत्वाची ओळख नुरली
नादान वृत्ति तव झाली
करितोस धन्याची 'हांजी हांजी' तू पोटासाठी ॥ ४ ॥

येताच धनी नाचावे
नाचत त्या सत्कारावे
तो वदेल ते बोलावे
तेव्हाच टाकितो मालक दाणे असले तुजपुढती ॥ ५ ॥

हे दाणे दिसती छान
जरि लाल आणि रसपूर्ण
त्याज्य ते विषासम जाण
पिंजऱ्यात मिळती म्हणुनि तयांची मुळि नाही महती ॥ ६ ॥

हा अध:पात तव झाला
डाळिंबचि कारण याला
भुलुनिया अशा तुकड्याला
पिंजऱ्यात मेले किती अभागी पोपट या जगती
हे डाळिंबाचे दाणे वेड्या। घात तुझा करिती ॥ ७ ॥

**प्रश्न :**

अ. खालील प्रश्नांची उत्तरे प्रत्येकी तीन ते चार वाक्यांत लिहा.

१. पाळीव पोपटास कोणते दिवस आठवायला सांगितले आहेत ? का ?
२. त्या दिवसांत पोपटाच्या जगण्याची रीत कोणती होती ?
३. पोपटाच्या बदललेल्या वृत्तीला 'नादान वृत्ती' असे का म्हटले आहे ?
४. मालक जे दाणे पोपटाच्या समोर टाकतो ते विषासमान कशामुळे ठरतात ?
५. पोपटाचा अध:पात कशामुळे झाला ?

आ. खालील प्रश्नांची उत्तरे एक ते दोन वाक्यांत सांगा.

१. या कवितेतील आशय कोणत्या वृत्तीच्या माणसांना लागू पडतो ?
२. पोपटाच्या पूर्वीच्या आयुष्यातील दिवसांना सोन्याचे दिवस असे का म्हटले आहे ?
३. कोणत्या उद्देशाने मालक पोपटासमोर दाणे टाकतो ?
४. डाळिंबाचे दाणे पोपटाच्या घातास कसे काय कारण ठरतात ?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. पारतंत्र्यातील दुःख आणि स्वातंत्र्यातील सुख या विषयावर पंधरा ते वीस वाक्यांचे एक भाषण लिहून काढा.
२. 'पाळीव पोपटाचे मनोगत' या मथळ्याखाली एक छोटासा निबंध लिहा.
३. गुलामीत सुख मानणाऱ्या इसमास उद्देशून एक उपदेशपर पत्र लिहा.





# ७. माझी कन्या

**बी (नारायण मुरलीधर गुप्ते - १८७२-१९४७)**

जुन्या पिढीतील प्रसिद्ध कवी. 'फुलांची ओंजळ' हा काव्यसंग्रह प्रसिद्ध. ही कविता 'आठवणीतल्या कविता' (भाग १) या पुस्तकातून घेतली आहे.

कवीच्या लाडक्या मुलीस शाळेत कुणीतरी टाकून बोलले, त्यामुळे तिला फार वाईट वाटले व ती रडू लागली. कवीने कवितेत अत्यंत लडिवाळपणाने तिची समजूत काढली आहे.

---

गाई पाण्यावर काय म्हणुनि आल्या ?
का ग गंगायमुनाहि या मिळाल्या ?
उभय पितरांच्या चित्त-चोरटीला
कोण माझ्या बोलले गोरटीला ॥ १ ॥



शुभ्र नक्षत्रे चंद्र चांदण्यांची
दूड रचलेली चिमुकली मण्यांची
गडे ! भुईवर पडे गडबडून,
का ग आला उत्पात हा घडून ? ॥ २ ॥

तुला 'लंकेच्या पार्वती' समान
पाहुनीया, होवोनि साभिमान
काय त्यांतिल बोलली एक कोण
"अहा ! — आली ही पहा — भिकारीण !" ॥ ३ ॥

पंकसंपर्के कमळ का भिकारी ?
धूलिसंसर्गे रत्न का भिकारी ?
सूत्रसंगे सुमहार का भिकारी ?
कशी तूही मग मजमुळे भिकारी ? ॥ ४ ॥

भेट गंगायमुनांस होय जेथे
सरस्वतिही असणार सहज तेथे
रूपसद्गुणसंगमी तुझ्या तैसे
भाग्य निश्चित असणार ते अपैसे ॥ ५ ॥

लाट उसळोनी जळी खळे व्हावे,
त्यात चंद्राचे चांदणे पडावे
तसे गाली हासता तुझ्या व्हावे,
उचंबळुनी लावण्य वर वहावे ॥ ६ ॥

कोण देतो सद्गुणी बालकांना
काय म्हणुनी आम्हांस करंट्यांना ?
लांब त्याच्या गावास जाउनीया
गूढ घेतो हे त्यास पुसोनीया ! ॥ ७ ॥

'गावि जातो,' ऐकता त्याच काली
पार बदलुनी ती बालसृष्टि गेली !
गळा घालुनि करपाश रेशमाचा
वदे 'येते मी' पोर अज्ञ वाचा ! ॥ ८ ॥

**प्रश्न :**

अ. खालील प्रश्नांची थोडक्यात उत्तरे लिहा.

१. आई-वडिलांसमोर कोणता प्रश्न उभा राहिला आहे ?
२. एखादी मुलगी आपल्या मुलीला 'भिकारीण' म्हणाली असेल असे आई-वडिलांना का वाटते ?
३. 'तू भिकारी नाहीस' हे कोणत्या प्रकारे सिद्ध केलेले आहे ?
४. 'तू भाग्यशाली आहेस' हे मुलीला पटवून देण्यासाठी कोणते उदाहरण दिलेले आहे?
५. 'कोण देतो सद्‌गुणी बालकांना, काय म्हणुनी आम्हांस करंट्यांना ?' असा प्रश्न का केला आहे ?

आ. खालील शब्दांच्या अर्थाचे अन्य शब्द लिहा.
चित्त, पंक, सूत्र, अपैसे, जळ, धनिक, कर.

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. आपल्या मुलीबद्दल पित्याच्या अंत:करणात येत असलेले विचार कवितेच्या आधारे ८ ते १० वाक्यांत लिहा.
२. खालील चरणाचा अर्थ स्पष्ट करा.
'लाट उसळोनी जळी खळे व्हावे,
त्यात चंद्राचे चांदणे पडावे
तसे गाली हासता तुझ्या व्हावे,
उचंबळुनी लावण्य वर वहावे.'

**व्याकरण :**

### अक्षरगण वृत्ते

पद्यरचनेचे जे प्रकार आहेत, त्यांत 'वृत्ते' किंवा 'छंद' येतात. वृत्तांचे आणि छंदांचे काही नियम असतात.

१. प्रत्येक वृत्तातील अक्षरांची संख्या ठरावीक असते.

२. प्रत्येक वृत्तातील ओळींना 'पद' किंवा 'चरण' म्हणतात किंवा 'पद्यपंक्ती' असेही म्हणतात.

३. वृत्ताच्या प्रत्येक चरणातील ऱ्हस्व आणि दीर्घ अक्षरांचा क्रम ठरावीक असतो.

४. वृत्तातील ऱ्हस्व अक्षरांना 'लघू' अक्षरे म्हणतात.

५. वृत्तातील दीर्घ अक्षरांना 'गुरू' अक्षरे म्हणतात.

६. लघू अक्षराची खूण '⏑' अशी व गुरू अक्षराची खूण '—' अशी असते.

ज्या वृत्तातील अक्षरांची संख्या ठरावीक असते व त्या अक्षरांचा लघू-गुरू क्रम-सुद्धा ठरावीकच असतो, त्या वृत्तांना 'अक्षरगण वृत्ते' म्हणतात.





# ८. महानतेचा मानदंड तू

**पद्मा (पद्मा गोळे - १९१३ - १९९८)**

ज्येष्ठ आधुनिक कवयित्री. स्त्रीमनाची हळुवार, स्वप्नाळू भावना त्यांच्या कवितेत प्रकटते. 'नीहार', 'स्वप्नजा', 'प्रीतिपथावर', 'आकाशवेली' इत्यादी त्यांचे कवितासंग्रह प्रसिद्ध आहेत. ही कविता 'श्रावणमेघ' या कवितासंग्रहातून घेतली आहे.

या कवितेत छत्रपती शिवाजीमहाराजांच्या कार्याचा गौरव केला आहे.

---

भयाण अंधाराने होते जीव कोंदुनि गेले,
जोखड वाहत मानेवरती जगणे नशिबी आले.

तुकड्यासाठी मान विकुनिया केली भिक्षांदेही,
निजधर्माची वा देशाची चाडच उरली नाही.



पालखीतुनी मिरवत होते ते विकले गेलेले,
स्वाभिमान अन् क्षात्रतेज तर धुळीत मिळुनी गेले.

या अंधारी दिशादिशांवर प्रकाश फेकित येसी
महानतेचा मानदंड तू, महाराष्ट्री अवतरसी.

स्पर्श तुझ्या पायांचा हो अन् पेटुनि उठली माती,
पायतळीचे दगडहि उठले मिळवित प्राणज्योती.

नजर तुझी संजीवक पडता वठल्या झाडावरती,
समशेरींसह लाख मावळे वीर प्रगटले भवती.

झोपड्यांतुनी उभे ठाकले सशस्त्र गड अन् किल्ले,
तोफांनाही अजिंक्य ठरले केवळ बरच्या, भाले.

पराभूत ही भूमी उठली शस्त्रास्त्रे परजुनिया,
महाराष्ट्राला महानतेप्रत नेसी तू शिवराया !

**प्रश्न :**

अ. खालील प्रश्नांची उत्तरे प्रत्येकी चार ते पाच वाक्यांत लिहा.

१. 'जोखड वाहत मानेवरती जगणे नशिबी आले' या ओळीतील हे जोखड कोणते ? कोणत्या काळातले ?

२. त्या काळात येथील एकंदर जनजीवनाची अवस्था कोणती होती ?

३. अशा परिस्थितीत छत्रपती शिवराय यांचा उदय होताच काय घडले ?

४. 'महानतेचा मानदंड तू' असे कोणाला उद्देशून म्हटले आहे ? का ?

आ. खालील प्रश्नांची उत्तरे एक ते दोन वाक्यांत द्या.

१. 'तुकड्यासाठी मान विकुनिया केली भिक्षांदेही' असे कोणास म्हटले आहे ?

२. 'स्पर्श तुझ्या पायांचा हो अन् पेटुनी उठली माती,
पायतळीचे दगडहि उठले मिळवित प्राणज्योती', म्हणजे त्या वेळी नेमके काय घडले ?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. खालील चरणांचा अर्थ सोदाहरण स्पष्ट करा.
झोपड्यांतुनी उभे ठाकले सशस्त्र गड अन् किल्ले,
तोफांनाही अजिंक्य ठरले केवळ बरच्या, भाले.

२. विसाव्या शतकात महात्मा गांधी यांनी भारतात अशाच प्रकारची कामगिरी अहिंसक व शांततामय मार्गाने करून दाखवली. त्यासंबंधीची माहिती मिळवा आणि ‘मानवतेचा मानदंड तू’ या शीर्षकाखाली एक लेख तयार करा.

**व्याकरण :**

### अक्षरगण

वृत्ताच्या चरणाचे मापन करण्यासाठी लघू-गुरू भेदाप्रमाणे तीन-तीन अक्षरांचे गट पाडण्यात येतात. त्यांना ‘अक्षरगण’ असे म्हणतात.

लघू गुरू भेदाप्रमाणे अक्षरांचे गण आठ आहेत. प्रत्येक गणात तीन-तीन अक्षरे असतात.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १. आदय लघू | य | मा | ता | य | गण |
| | ∪ | - | - | | |
| २. सर्व गुरू | मा | ता | रा | म | गण |
| | - | - | - | | |
| ३. अंत्य लघू | ता | रा | ज | त | गण |
| | - | - | ∪ | | |
| ४. मध्य लघू | रा | ज | भा | र | गण |
| | - | ∪ | - | | |
| ५. मध्य गुरू | ज | भा | न | ज | गण |
| | ∪ | - | ∪ | | |
| ६. आदय गुरू | भा | न | स | भ | गण |
| | - | ∪ | ∪ | | |
| ७. सर्व लघू | न | स | ल | न | गण |
| | ∪ | ∪ | ∪ | | |
| ८. अंत्य गुरू | स | ल | गा | स | गण |
| | ∪ | ∪ | - | | |

- लघू ल ∪
- गुरू ग -

पदय चरणातील तीन-तीन अक्षरांचे गट पाडल्यानंतर शेवटी एक-दोन अक्षरे राहिली तर लघुबद्दल ‘ल’ आणि गुरूबद्दल ‘ग’ असे या गणांच्या नंतर लिहितात. शेवटचे अक्षर नेहमी गुरू धरले जाते.

आता आपण खालील पद्यपंक्तीचे 'गण' पाडूया.

दे दान गुप्त उपकार करी न बोले.

| दे दा न | गु प्त उ | प का र | क री न | बो | ले |
|---|---|---|---|---|---|
| - - ᴗ | - ᴗ ᴗ | ᴗ - ᴗ | ᴗ - ᴗ | - | - |
| त | भ | ज | ज | ग | ग |

या चरणाचे गण असे आहेत — त भ ज ज ग ग.

आता खालील पद्यपंक्तीचे 'गण' पाडा.

१. मना सर्व लोकांसि रे नीववावे ।

२. विद्या हे पुरुषास रूप बरवे की झाकले द्रव्यही ।





लघुचित्र

# कळ्याफुलांचे लघुचित्र

निसर्गातील फुलझाडे, वेली, उमललेली आणि उमलणारी फुले, त्यांच्या आसपास तरंगणारी फुलपाखरे, रंगून जाणारे पक्षी यांचे एक निवांतरम्य जग असते. प्रत्यक्षात असे हे जग खूपच ऐसपैस असते. आकाश, त्यात रेंगाळणारे ढग, जलाशय यांचीही सोबत त्या जगाला असते. चित्रकार आपल्या कल्पनाशक्तीने व कुंचल्याच्या कौशल्याने ही रंगीबेरंगी पुष्पसृष्टी लघुचित्राच्या रूपाने साकार करतो. मूळच्या वास्तव निसर्गरूपांच्या रंग, रेखा नि आकारांना आपल्या शैलीने आकर्षक व सूचक असे वळण देतो. सोबतचे चित्र हे या प्रकारचे शैलीकरण केलेले कळ्याफुलांचे नयनरम्य लघुचित्र आहे. दख्खनमधील गोवळकोंड्याच्या कुतुबशाही दरबारातील एका अनामिक चित्रकाराने इ.स.१६५० च्या सुमारास काढलेले हे लघुचित्र आहे. तत्कालीन लघुचित्रणातील संकेतांचा प्रभाव या चित्रावर नाही, हे त्याचे वैशिष्ट्य होय.

वसंत ऋतूत बहरून येणाऱ्या फुलझाडांच्या नक्षीचित्रासारखे हे लघुचित्रण आहे. फुलझाडांच्या लयदार डहाळ्या, त्यांना लगडलेली गुलाबी छटेची शुभ्र फुले आणि कळ्यांचे गेंद, करवती काठाची हिरवट पाने, तरंगणारी फुलपाखरे व भृंग, पारव्यांचे जोडपे, चित्राच्या तळाशी वजनदारपणे पसरलेल्या पंचदल फुलांच्या वेली आणि वरच्या भागात रेंगाळलेले आभाळातील फिके ढग अशा छोट्या चौकटीत हे चित्र प्रसन्नपणे उभे केलेले आहे. पारव्यांची जोडी वासंतिक मोसमाशी सुसंगतही वाटते. तांबड्या व पिवळ्या या मूलभूत रंगाच्या पांढऱ्या रंगाच्या मिश्रणाने मिळणाऱ्या उजळ उठावदार छटा या लघुचित्रातून वासंतिक चैतन्याचाच सुखद अनुभव देतात. उजव्या बाजूच्या टपोऱ्या फुलांशी डाव्या बाजूच्या कळ्याफुलांच्या वळणदार डहाळ्यांनी सुंदर तोल सांभाळलेला आहे. चित्राचा गडद तळभाग व फिकट शिरोभाग यातही सुंदर समतोल जाणवतो. फिक्या रंगछटांनी, पानाफुलांच्या व डहाळ्यांच्या वक्ररेषांनी या लघुचित्रातील नक्षीचा आकृतीबंध नयनरम्य झालेला आहे.

हे लघुचित्र चिनी-जपानी पुष्परचनेसारखे वाटते. पिवळटतांबूस रंगाच्या पार्श्वभूमीमुळे हे लघुचित्रण शैलीकरण केलेले आहे, हेही आपल्या लक्षात येते. कळ्या, फुले, वेली, फुलपाखरे, भृंग, पक्षी यांचा वासंतिक उल्हास व उत्सव या लघुचित्रातून दिसून येतो.

**- प्रा. रा. ग. जाधव**

*(ट्रेझर्स ऑफ इस्लाम, प्रकाशक वेलफ्लीट प्रेस, ११०, एंटरप्राईज ॲव्हेन्यू, सेकॉकस, न्यू जर्सी ०७०९४ यांच्या सौजन्याने)*



# ९. मी न माझा राहिलो

**मनमोहन (गोपाळ नरहर नातू - १९११-१९९१)**

ज्येष्ठ मराठी कवी. 'आदित्य', 'उद्धार' ही त्यांची खंडकाव्ये; 'कुहूकुहू', 'मंजुळ भावगीते' इत्यादी कवितासंग्रह; 'देणे देवाचे' हा लघुकथासंग्रह ही त्यांची पुस्तके प्रसिद्ध आहेत.

ही कविता 'काव्यवाहिनी' (भाग ४) या पुस्तकातून घेतली आहे.

येथूनच घेतले, येथेच दिले, यात माझे काय होते ? निरिच्छ वृत्तीने दुसऱ्यासाठी काही करू शकलो, ही समाधानाची नम्र भावना या कवितेत कवीने व्यक्त केली आहे.

---

या नदीला घाट छोटा
बांधुनी मी चाललो !

जन्मली वेदांसवे जी
सिंधु ही सारस्वताची
दे स्मृती आता श्रुतींची
व्यास आणि वाल्मिकींची,
मी इच्या पाण्यात रसिका
थेंब म्हणुनी खेळलो !

मी नव्हे शिल्पज्ञ मोठा,
तंत्र नव्हते माहिती,
चार धोंडे जोडणारी
ही किनाऱ्याचीच माती,
फक्त तिचा चिखल व्हाया
अंतरी मी ओळलो !

या प्रवाहाच्या गतीला
पृथ्वी गाते आरती
जी त्रिकालज्ञास ठेवी
आपुल्या विस्तीर्ण पोटी
ताज बांधो बांधणारा,
मी वडारी जाहलो !

गर्व कुठला, गर्जनाही
या निवांतातून जाई,
ईश्वरी कंठातली का
जाइ कोमेजून जाई ?
लोटताना देह डोही
मी न माझा राहिलो ..... !

**प्रश्न :**

अ. खालील प्रश्नांची प्रत्येकी तीन ते चार वाक्यांत उत्तरे लिहा.

१. 'या नदीला घाट छोटा, बांधुनी मी चाललो' असे म्हणून कवी स्वत:संबंधी काय सुचवत आहे ?
२. 'मी इच्या पाण्यात रसिका थेंब म्हणुनी खेळलो' असे सांगून कोणत्या आणि कोणी निर्मिलेल्या पाण्याचा कवी उल्लेख करत आहे ?
३. पृथ्वीचे मोठेपण कवीने कोणत्या शब्दांत वर्णन केले आहे ?
४. 'लोटताना देह डोही, मी न माझा राहिलो' असे कवी का म्हणतो ?
५. या कवितेतून कवीचे कोणते वैशिष्ट्य कळून येते ?

आ. खालील प्रश्नांची उत्तरे प्रत्येकी एक ते दोन वाक्यांत सांगा.

१. व्यास आणि वाल्मीकी यांनी कोणत्या महाकाव्यांची निर्मिती केली ?
२. 'मी नव्हे शिल्पज्ञ मोठा, तंत्र नव्हते माहिती' असे सांगून कवी काय सुचवतो ?
३. कोणती इच्छा राखून कवी काव्यनिर्मितीकडे वळला ?
४. कवीचा नम्र भाव कोणत्या उद्‌गारांतून व्यक्त होतो ?

## स्वाध्याय व उपक्रम :

१. आशयाचा तूच स्वामी । शब्दवाही मी भिकारी,
मागण्याला अंत नाही आणि देणारा मुरारी ।
मर्ढेकरांच्या या ओळींतील अर्थ समजावून घ्या.

२. 'फोडिले भांडार, धन्याचा तो माल, मी तव हमाल भारवाही'.
संत तुकाराम यांच्या या वचनाचा अर्थ समजावून घ्या.

३. 'आम्ही कोण म्हणून काय पुसता ?' ही केशवसुतांची कविता मिळवून वाचा.

४. रामायण, महाभारत, वाल्मीकी, व्यास यांची स्थूलरूपात माहिती करून घ्या.

### व्याकरण :

वृत्तातील कोणते अक्षर 'लघू' व कोणते अक्षर 'गुरू' असते, यासाठी खालील गोष्टी लक्षात ठेवाव्या:

१. स्पष्ट अनुस्वार असलेले अक्षर 'गुरू' असते.
२. विसर्गयुक्त अक्षर 'गुरू' असते.
३. शब्दातील जोडाक्षराच्या आधीचे अक्षर जरी लघू असले, तरी ते 'गुरू' धरावे. त्या जोडाक्षरावर उच्चारताना आघात दयावा लागला तरच आधीचे लघू अक्षर 'गुरू' धरले जाते. पण जर त्या जोडाक्षरावर आघात येत नसेल तर त्याच्या आधीचे लघू अक्षर लघूच राहते. जसे – तुझ्या, तिच्या, आमच्या, तुमच्या, आपल्या, तऱ्हा, पुन्हा, पाहिल्यावर... इत्यादी.
४. जोडाक्षर जर ऱ्हस्व स्वरयुक्त असेल, तर ते 'लघू'च असते.





# १०. श्लोक

**संत रामदास (नारायण सूर्याजी ठोसर - १६०८-१६८१)**

परमार्थाप्रमाणे प्रपंचवादाचा समर्थपणे पुरस्कार करणारे संतकवी. 'दासबोध' हा त्यांचा प्रख्यात ग्रंथ. त्याशिवाय स्तोत्रे, करुणाष्टके, अभंग, मनाचे श्लोक इत्यादी त्यांच्या रचना प्रसिद्ध. त्यांची भाषा ठसठशीत, नेमकी व सुबोध आहे. त्यांचे अनेक श्लोक बोधदायी आहेत.

**वामन पंडित (१६०८-१६९५)**

संत कवींप्रमाणेच पंडित कवींचीही परंपरा प्राचीन मराठी कवितेत होऊन गेली. वामन पंडितांनी पुराणांतील विषयांवर स्फुटकाव्ये लिहिली आहेत. 'यथार्थदीपिका' या नावाने गीतेवर त्यांनी केलेली टीका प्रसिद्ध आहे.

प्रस्तुत वेचे 'नवनीत' या पुस्तकातून घेतले आहेत.

---

(भुजंगप्रयात)

मना श्रेष्ठ धारिष्ट जीवी धरावे ।
मना बोलणे नीच सोशीत जावे ॥
स्वये सर्वथा नम्र वाचे वदावे ।
मना सर्व लोकांसि रे नीववावे ॥ १ ॥

तनू त्यागिता कीर्ति मागे उरावी ।
मना सज्जना हेचि क्रीया धरावी ॥
मना चंदनाचेपरी त्वां झिजावे ।
परी अंतरी सज्जना नीववावे ॥ २ ॥

**— संत रामदास**

(वसंततिलका)

- १ -

द्रव्यास हे गमन-मार्ग यथावकाश ।
की दान, भोग अथवा तिसरा विनाश ॥

जो घे न भोग-जरि, पात्र-करी न देही।
त्याच्या धनास मग केवळ नाश पाही ॥

- २ -

दे दान गुप्त, उपकार करी न बोले।
मानी प्रमोद जरि मान्य घरास आले ॥
दावी न गर्व विभवे गुण घे पराचे।
खड्गाग्र-तुल्य विषम-व्रत हे भल्याचे ॥

— वामन पंडित

**प्रश्न :**

अ. खालील प्रश्नांची उत्तरे प्रत्येकी एक ते दोन वाक्यांत लिहा.

१. सर्व लोकांबरोबर शांतपणाने वागता यावे म्हणून रामदासांनी मनाला कोणता उपदेश केला आहे ?

२. मनाने काय करावे आणि कोणत्या प्रकारे कष्टावे असे रामदास सांगतात ?

आ. खालील प्रश्नांची थोडक्यात उत्तरे लिहा.

१. कोणत्या तीन मार्गांनी माणसाच्या हातून द्रव्य निघून जाते ?

२. कोणाचे धन नाश पावेल असे कवी म्हणतो ?

३. भली, सज्जन माणसे आयुष्यात कोणते व्रत आचरत असतात ?

४. हे व्रत खड्गाग्र-तुल्य आहे असे का म्हटले आहे ?

**स्वाध्याय व उपक्रम :**

खालील चरणांचा अर्थ स्पष्ट करा.
'स्वये सर्वथा नम्र वाचे वदावे.'
'मना चंदनाचेपरी त्वां झिजावे.'
'दावी न गर्व विभवे गुण घे पराचे.'

**व्याकरण :**

### १. भुजंगप्रयात - वृत्त

या वृत्ताच्या प्रत्येक कडव्यात चार चरण असतात. प्रत्येक चरणात १२-१२ अक्षरे असतात. उदा. -

मना श्रेष्ठ धारिष्ट जीवी धरावे ।
मना बोलणे नीच सोशीत जावे ।
स्वये सर्वथा नम्र वाचे वदावे ।
मना सर्व लोकांसि रे नीववावे ॥

| म | ना | श्रे | ष्ठ | धा | रि | ष्ट | जी | वी | ध | रा | वे |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ∪ | - | - | ∪ | - | - | ∪ | - | - | ∪ | - | - |
| | | य | | | य | | | य | | | य |

- भुजंगप्रयात वृत्ताचे गण - य य य य.
- या वृत्ताचे चरण म्हणताना पहिल्या सहा अक्षरांनंतर किंचित थांबावे लागते. चरण म्हणताना चरणात जेथे थांबावे लागते, त्याला 'यती' म्हणतात.
- भुजंगप्रयात वृत्ताच्या वरील चरणात 'मना श्रेष्ठ धारि' नंतर किंचित थांबावे लागते, तेथे या वृत्ताचा 'यती' आहे.
- या चरणातील यतीमुळे धारिष्ट हा शब्द 'धारि' येथे तुटला आहे व त्याचे धारि व ष्ट असे दोन तुकडे तो चरण म्हणताना होतात. म्हणून येथे 'यतिभंग' झाला असे म्हणतात. 'यती' स्थान चरणातील शब्द पूर्ण झाल्यानंतर येत असेल, तर त्या चरणात 'यतिभंग' नसतो.

## २. वसंततिलका - वृत्त

या वृत्ताच्या प्रत्येक चरणात १४ अक्षरे असतात आणि प्रत्येक कडव्यात चार चरण असतात.

द्रव्यास हे गमन-मार्ग यथावकाश ।
की दान, भोग अथवा तिसरा विनाश ।
जो घे न भोग-जरि पात्र-करी न देही ।
त्याच्या धनास मग केवळ नाश पाही ॥

| द्र | व्या | स | हे | ग | म | न | मा | र्ग | य | था | व | का | श |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| - | - | ∪ | - | ∪ | ∪ | ∪ | - | ∪ | ∪ | - | ∪ | - | - |
| | त | | | भ | | | ज | | | ज | | ग | ग |

- वसंततिलका वृत्ताचे गण - त भ ज ज ग ग.
- यतिस्थान - ८ अक्षरांनंतर.



# ११. पुन्हा एकदा

**प्रतिमा इंगोले (प्रतिमा पंजाबराव इंगोले - जन्म : १९५३)**

वऱ्हाडी भाषेत कथालेखन. 'हजारी बेलपान', 'अकसिदीचे दाने', 'सुगरनचा खोपा' व 'लेक भुईची' हे कथासंग्रह व 'जावयाचा पोर' हे स्त्री-जीवनाचे दर्शन घडवणारे पुस्तक प्रसिद्ध.

'पुन्हा एकदा' ही कविता 'किशोर' या मासिकातून घेतली आहे.

नवनिर्माणाचा ध्यास घेतलेल्या मनाच्या भावस्थितीचे वर्णन या कवितेत केले आहे.

---

पुन्हा एकदा
चमकावी वीज
उतरावी खाली
भिनावी रक्तात
पेटावे स्नायू
करीत पुकार
पुन्हा एकवार



पुन्हा एकदा
घालीत पिंगा
पावसाच्या सरी
व्हाव्यात बेभान
कोसळाव्या खाली
मातीत माती
व्हावी एक ...
पुसून टाकीत
भेदाभेद ...
पुन्हा एकवेळ ...



पुन्हा एकदा
घुमावा वारा
युवक इथला
भारला जावा
भुलावी तहान
विसरावी भूक
नवनिर्माणाची
लागावी चाहूल
उजळावी भूमी ...
दिगंतात ...
पुन्हा एकदा ...





**प्रश्न :**

खालील प्रश्नांची उत्तरे प्रत्येकी तीन ते चार वाक्यांत लिहा.

१. वीज चमकून काय घडावे असे कवितेत म्हटले आहे ?

२. पावसाच्या सरी कोसळाव्यात असे कवयित्रीला का वाटते ?

३. वारा घुमून काय व्हावे असे कवितेत सांगितले आहे ?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. खालील चरणांचे थोडक्यात स्पष्टीकरण करा.

अ. 'पेटावे स्नायू, करीत पुकार'

ब. 'मातीत माती व्हावी एक'

क. 'उजळावी भूमी दिगंतात'

२. खालील शब्दसमूहांचे अर्थ सांगा.

भेदाभेद पुसून टाकणे, नवनिर्माणाची चाहूल लागणे.

३. आपल्या देशात शांतता निर्माण व्हावी यासाठी 'पुन्हा एकदा' काय व्हावे असे तुम्हांला वाटते ? दहा ते पंधरा वाक्यांत लिहा.

**व्याकरण :**

### ३. शार्दूलविक्रीडित - वृत्त

या वृत्ताच्या प्रत्येक चरणामध्ये १९ अक्षरे असतात.

प्रत्येक कडव्यात (श्लोकात) चार चरण असतात.

उदयानात अनंत वृक्ष फुलले, त्यांची सुगंधी फुले ।
घेतो जो न करात तोच सुकती, पस्तावतो त्यामुळे ।
पुष्पे वेचुनिया तुझी तर तया, मी ठेविली गुंफुनी ।
त्यांचा गंध अनंत काळ टिकतो, जाती न कोमेजुनी ॥

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| उ दया ना | त अ नं | त वृ क्ष | फु ल ले | त्यां ची सु | गं धी फु | ले |
| - - - | ∪ ∪ - | ∪ - ∪ | ∪ ∪ - | - - ∪ | - - ∪ | - |
| म | स | ज | स | त | त | ग |

- शार्दूलविक्रीडित वृत्ताचे गण - म स ज स त त ग.
- यतिस्थान - १२ अक्षरांनंतर.
- वरील श्लोकाच्या चारही चरणांमध्ये यतिभंग नाही.
- मंगलाष्टकांचे श्लोक शार्दूलविक्रीडित वृत्तात असतात.





# १२. माणूस

**राम मोरे (जन्म : १९४१)**

यांची अनेक गाणी ध्वनिमुद्रित झालेली आहेत. 'पहाटगाणे' या पुस्तकात त्यांची सर्व गाणी व कविता संग्रहित केलेल्या आहेत. अनेक नाटके व चित्रपटांसाठी त्यांनी गीतलेखन केले आहे. प्रस्तुत कविता पहाटगाणे या संग्रहातून घेतली आहे.

निसर्ग आणि विज्ञान यात दिगंताचा प्रवासी माणूस उभा आहे. त्याला काय काय करायचे आहे, ते या कवितेत सांगितले आहे.

---

प्रवासी मी दिगंताचा
युगे युगे माझी वाट
मज चालायचे असो
सुख, दुःख, माळ, घाट

झेप गरुडाची अंगी
शस्त्र विज्ञानाचे हाती
श्रम-शास्त्राच्या युतीने
पृथ्वी करीन थांबती

चंद्र, सूर्य, ग्रह, तारे
तुडवीन पायदळी
स्वर्गातुनी सुरासूर
पाठवीन मी पाताळी

वारा करीन गुलाम
वर्षा बांधीन दाराशी
माझे वैभव पाहुनी
लक्ष्मी लाजेल स्वत:शी

जे जे असेल अज्ञात
घेता करुनिया ज्ञात
पाठीवरी मात्र हवा
कुण्या प्रेमळाचा हात

**प्रश्न :**

खालील प्रश्नांची उत्तरे प्रत्येकी दोन ते तीन वाक्यांत लिहा.

१. या जगात मानवाची वाटचाल युगानुयुगे चालू आहे. या वाटचालीतून मानव काय साधू पाहत आहे ?

२. विज्ञान आणि श्रम-शास्त्र यांच्या बळावर माणसाला कोणते यश मिळवायचे आहे ?

३. माणसाला अजूनही अज्ञात असलेल्या कितीतरी गोष्टींचा शोध घ्यायचा आहे; पण त्यासाठी कोणत्या गोष्टीची आवश्यकता आहे असे कवी सांगत आहे ?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. 'विज्ञानयुगातील माणूस' या विषयावर एक छोटासा निबंध लिहा.

२. 'विज्ञान – शाप की वरदान' या विषयावरील वादविवाद सभेत एक बाजू घेऊन तुम्हांला तुमचे विचार मांडायचे आहेत, अशी कल्पना करून टाचण तयार करा.



# १३. माझी जन्मभूमी

**ना. वा. टिळक (रे. नारायण वामन टिळक - १८६२-१९१९)**

हे 'फुलामुलांचे कवी' म्हणून परिचित. निसर्गावर टिळकांचे प्रेम होते. 'ख्रिस्तायन' हे महाकाव्य त्यांनी लिहिले आहे. 'टिळकांची कविता' या नावाने त्यांचा कवितासंग्रह प्रसिद्ध आहे. प्रस्तुत कविता याच संग्रहातून घेतली आहे.

या कवितेत त्यांनी जन्मभूमीविषयी वाटणारा अभिमान व्यक्त केला आहे.

---

सृष्टी तुला वाहुनी धन्य ! माते, अशी रूपसंपन्न तू निस्तुला
तू कामधेनू ! खरी कल्पवल्ली ! सदा लोभला लोक सारा तुला,
या वैभवाला तुझ्या पाहुनीया, मला स्फूर्ति नृत्यार्थ होते जरी,
सामर्थ्य नामी तुझ्या जन्मभूमी, तसे पाहिले मी न कोठे तरी ।

माते ! महात्मे तुझे, तत्त्ववेत्ते, तुझे शूर योद्धे, तुझे सत्कवी,
श्रेणी जयांची सदा माझिया गे, मना पूजनी आपुल्या वाकवी ।
यांची यशे ज्या नव्या सद्गुणांना मला अर्पिती, ध्येय ते गे जरी,
सामर्थ्य नामी तुझ्या जन्मभूमी, तसे पाहिले मी न कोठे तरी ।

तुझ्या महोदार सारस्वताच्या महासागरीचा जरी मीन मी
झालो, तरी गे तृषा मन्मनाची कधीही कधीही न होणे कमी
आई ! गुरुस्थान अंती जगाचे तुझे ! यात शंका न काही जरी
सामर्थ्य नामी तुझ्या जन्मभूमी, तसे पाहिले मी न कोठे तरी ।

वारा तुझ्या स्पर्शने शुद्ध झाला, मला लाधला ! भाग्य हे केवढे !
माते ! स्वये देशि जे अन्नपाणी, सुधा बापुडी कायशी त्यापुढे !
तू बाळगीशी मला स्कंधि अंकी ! सुखाची खरी हीच सीमा पुरी !
सामर्थ्य नामी तुझ्या जन्मभूमी, तसे पाहिले मी न कोठे तरी ।

## प्रश्न :

खालील प्रश्नांची उत्तरे प्रत्येकी दोन ते तीन वाक्यांत लिहा.

१. कवीला नृत्य करण्याची स्फूर्ती कशामुळे प्राप्त होते ?

२. जन्मभूमीतील कोणाकोणामुळे कवीच्या मनात आदरभाव निर्माण होतो ?

३. ............ 'तृषा मन्मनाची कधीही न होणे कमी' असे कवीने म्हटले आहे. कवीच्या मनाला लागलेली ही तृषा कोणती ?

४. आपल्या सुखाची परिसीमा झाली आहे, असे कवीला का वाटते ?

## स्वाध्याय व उपक्रम :

१. कवीने असे का म्हटले असेल ते स्पष्ट करून सांगा.
'सामर्थ्य नामी तुझ्या जन्मभूमी, तसे पाहिले मी न कोठे तरी ।'
'आई ! गुरुस्थान अंती जगाचे तुझे ! यात शंका न काही जरी ।'

२. आपल्या जन्मभूमीचे वर्णन करणाऱ्या कविता मिळवून वाचा.
(उदा. कवी माधवांची 'हिरवे तळकोंकण', केशवसुतांची 'माझे खेडे', बोरकरांची 'माझ्या गोव्याच्या भूमीत'.)

३. 'भारत माझा जगी महान' या मथळ्याखाली एक वीस-पंचवीस वाक्यांचा निबंध लिहा.





# १४. शिष्टाची लक्षणे

**एकनाथ (१५३३-१५९९)**

श्रेष्ठ संतकवी. त्यांनी महाराष्ट्रात भागवत धर्माचा प्रसार केला. 'एकनाथी भागवत', 'भावार्थ रामायण', 'रुक्मिणी-स्वयंवर' हे ग्रंथ; अभंग, भारुडे व गौळणी इत्यादी त्यांच्या रचना 'एकनाथ-गाथा' या ग्रंथात संग्रहित केल्या आहेत. या ओव्या 'नवनीत' मधून घेतल्या आहेत.

एकनाथांनी खालील ओव्यांतून शिष्टाची लक्षणे सांगितली आहेत.

---

पडता वानरांचे अनुमोदन ॥ स्वये पुसे रघुनंदन ॥
शिष्ट पाठवावा कोण ॥ तो निवडोनि सांगा मज ॥ १ ॥

शिष्ट नसावा महा भ्याड ॥ शिष्टे न धरावी भीड
शिष्ट बोलका सुघड ॥ निवडा प्रौढ निज-बुद्धी ॥ २ ॥



शिष्ट पाहिजे चपळ चतुर ॥ देऊ जाणे प्रत्युत्तर ॥
राहोनिया धुरे-समोर ॥ स्वामि-कार्य-साधक ॥ ३ ॥

हनुमान म्हणे रघुनंदना ॥ वानर वीरांची गणना
वीस पद्मे संख्या जाणा ॥ आंगवणे अति-बळी ॥ ४ ॥

याहि माजि वाळि-सुत ॥ अंगद बळे विख्यात ॥
रावणाचे सभे आंत ॥ अति समर्थ बोलावया ॥ ५ ॥

अंगद बोलोनि निघोट ॥ अंगद वीर धीर सु-भट ॥
गांजू शके दश-कंठ ॥ तोचि शिष्ट योजावा ॥ ६ ॥

**प्रश्न :**

खालील प्रश्नांची थोडक्यात उत्तरे लिहा.

१. कवितेत शिष्टाची कोणती लक्षणे सांगितली आहेत ?
२. हनुमानाने वानरांचे कोणते श्रेष्ठत्व सांगितले आहे ?
३. रावणाच्या सभेत 'शिष्ट' म्हणून पाठवण्यास अंगद योग्य का वाटतो ?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. खालील ओळींतील अर्थ स्पष्ट करा.
राहोनिया धुरे-समोर ॥ स्वामि-कार्य-साधक ॥
वीस पद्मे संख्या जाणा ॥ आंगवणे अति-बळी ॥

२. निज-बुद्धि, रघुनंदन, वाळि-सुत, सु-भट या सामासिक शब्दांची फोड करून समासांची नावे सांगा.

३. तुम्ही अंगद आहात असे समजून रावणाशी शिष्टाई करताना काय सांगाल ते वर्गात बोला.

४. तुमच्या दोन मित्रांत मतभेद झाले असे समजून तुम्ही मित्रांना कसे समजवाल ते दहा-बारा वाक्यांत सांगा.

५. एकनाथ महाराजांची काही भारुडे मिळवा व वर्गात वाचून दाखवा.



## १५. प्रकाशमान व्हा !

**हिरा बनसोडे (हिरा गुलाबराव बनसोडे - जन्म : १९३९)**

नव्या पिढीतील कवयित्री. 'पौर्णिमा' व 'फिर्याद' हे त्यांचे दोन काव्यसंग्रह प्रसिद्ध झाले आहेत. समाजातील उपेक्षित घटक व स्त्रिया यांचे जिवंत अनुभव त्या आपल्या कवितेतून व्यक्त करतात.

ही कविता 'फिर्याद' या काव्यसंग्रहातून घेतली आहे.

दारिद्र्य व दुःखमय जीवन जगणाऱ्या जनसामान्यांच्या जीवनातील अज्ञान-अंधकार नष्ट करण्यासाठी 'प्रकाशमान व्हा' असा संदेश या कवितेतून दिला आहे.

---

त्या अंधाऱ्या प्रदेशात
सूर्योदय घेऊन मी जात आहे.
केविलवाणे सूर्यास्त वळणावळणांवर
खाली मान घालून उभे आहेत
शरणागतासारखे !

त्यांच्या निर्वासित आशा
हद्दपार झाल्या होत्या शतकांपूर्वीच
बहिष्कृत केलेले होते
त्यांच्या जीवनाचे आनंदोत्सव

दोस्तहो ....... !
तुमच्या डोळ्यांतील वाळवंट पुसून टाका
तिथे पेरायला आणल्यात मी
नवप्रेरणांच्या तेजस्वी बहरकळ्या,
धुऊन टाका चेहऱ्यावरला भयग्रस्त अंधार
प्रकाशाचे दिवे आणलेत मी तुमच्यासाठी
तुमच्या ऐतिहासिक शापांना

तुडवले मी वादळग्रस्त पावलांनी
आणि बंधमुक्त केलेत तुमचे कोंडलेले श्वास

राजहंसांनो ....... !
ओळखा तुमच्या तेजस्वी रूपाला
नि लुटा तुमच्या तडफदार युक्तीचा विजय

दोस्तांनो ....... !
तुमच्यासाठी मी सूर्योदय आणलेत
प्रकाशमान व्हा, प्रकाशमान व्हा !



**प्रश्न :**

अ. खालील प्रश्नांची उत्तरे प्रत्येकी तीन ते चार वाक्यांत लिहा.

१. 'प्रकाशमान व्हा' हा कवितेतील संदेश कोणाला उद्‌देशून देण्यात आलेला आहे?

२. सूर्योदय घेऊन मी त्या अंधाऱ्या प्रदेशात जात आहे, असे कवितेच्या आरंभीच म्हटले आहे. तो अंधारी प्रदेश कोणता ? सूर्योदय घेऊन जात आहे म्हणजे काय ?
३. जनसामान्यांच्या जीवनातील आनंदोत्सव बहिष्कृत केले होते म्हणजे काय ? हे कोणी व का केलेले असेल ?
४. जनसामान्यांच्या जीवनात बदल घडवण्यासाठी कवितेतील नायिकेने काय काय आणले आहे ?
५. कवितेतील नायिका जनसामान्यांना कोणता संदेश देत आहे ?

आ. खालील प्रश्नांची प्रत्येकी एक ते दोन वाक्यांत उत्तरे सांगा.
१. कवितेतील नायिका कोणत्या समाजाचा उद्धार करण्याकरता निघाली आहे ?
२. त्या समाजातील माणसांच्या डोळ्यांत वाळवंट पसरून राहिले होते म्हणजे काय ?
३. ते वाळवंट पुसून टाकल्यावर पुढे काय करायला नायिका सांगत आहे ?
४. समाजातील माणसांनी प्रकाशमान व्हायचे म्हणजे काय करायचे ?
५. कवितेत 'दोस्तहो', 'राजहंसांनो' अशी संबोधने आली आहेत. यावरून नायिकेच्या मनातील समाजाविषयीची कोणती भावना दिसून येते ?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. कवितेतील आशय डॉ. आंबेडकर, महात्मा फुले, छत्रपती श्री. शाहूमहाराज यांच्या कार्याचा संदर्भ देऊन स्पष्ट करा.
२. कवितेत अंधाऱ्या प्रदेशात, सूर्योदय, सूर्यास्त, निर्वासित आशा, डोळ्यांतील वाळवंट, तेजस्वी नवप्रेरणांच्या बहरकळ्या, प्रकाशाचे दिवे, ऐतिहासिक शाप, कोंडलेले श्वास अशा प्रकारचे उल्लेख आलेले आहेत. त्यांचा अर्थ नीट समजावून घ्या आणि या कवितेतील आशय पंधरा वाक्यांत लिहून काढा.



# शब्दार्थ पाहण्यापूर्वी हे वाचा

मराठी शब्दकोशाची रचना ठरावीक पद्धतीची असते. मराठी वर्णमालेत स्वरांचा व व्यंजनांचा जो क्रम असतो त्या क्रमानेच शब्दकोशातील शब्दांचा क्रम ठेवलेला असतो. आधी स्वर व नंतर व्यंजने येतात. हा क्रम पुढीलप्रमाणे असतो.

**स्वर** : अ, अ‍ॅ, आ, ऑ, इ, ई, उ, ऊ, ऋ, ए, ऐ, ओ, औ, अं, अः

**व्यंजन** : क, ख, ग्, घ्, ङ्, च्, छ्, ज्, झ्, ञ,
ट्, ठ्, ड्, ढ्, ण्, त्, थ्, द्, ध्, न्,
प्, फ्, ब्, भ्, म्, य्, र्, ल्, व्, श्,
ष्, स्, ह्, ळ्, क्ष्, ज्ञ्।

अ‍ॅ आणि ऑ हे दोन इंग्रजी भाषेतील स्वर आहेत.

ं (अनुस्वार) आणि ः (विसर्ग) हे स्वतंत्र वर्ण नाहीत. अनुस्वारयुक्त स्थान प्रत्येक स्वरानंतरचे आहे. अनुस्वारयुक्त वर्ण हा अनुस्वार नसलेल्या त्याच वर्णानंतर येईल.

स्वरांनी सुरू होणाऱ्या सर्व शब्दांनंतर व्यंजनांनी सुरू होणारे शब्द ('क' पासून 'ज्ञ' पर्यंत)दिले जातात. व्यंजनानी सुरू होणारे शब्द बाराखडीच्या क्रमाने दिले जातात.

'क' चे शब्द या क्रमाने येतील -

कढई - कंद - कः पदार्थ - कॅरम - काच - कांडण - कॉट - किडा - किंमत - कीर्ती - कुशल - कुंपण - कूट - कृपा - केशर - केंबळी - कैकयी - कैंचा - कोमट - कोंडा - कौशल्य - कौंतेय - क्रम - क्रंदन - क्रांती - क्रोध - क्रौंच

जोडाक्षरांनी सुरू होणारे शब्द व्यंजनाच्या बाराखडीनंतर बाराखडीच्या क्रमानेच दिले जातात. म्हणजे 'क' ची जोडाक्षरे 'क' चे शब्द संपल्यानंतर शब्दकोशात येतात. त्यांचा क्रम ठरवण्यासाठी जोडाक्षरांची फोड करावी लागते.

उदा. क्लेश = क् + ल + ए + श

क्रांती = क् + र + आ + अनुस्वार + ती

ही फोड लक्षात घेतली, तर शब्दकोशात क्रांती हा शब्द आधी येईल, क्लेश हा शब्द त्यानंतर येईल.

स्वरांच्या वरील क्रमानुसार 'ऊ' काराने सुरू होणारे शब्द संपल्यानंतर 'ऋ' या स्वराची जोडाक्षरे येतात.

उदा. 'कू' नंतर कृती, कृपा, कृष्ण इत्यादी.

'मूग' नंतर मृत्यू, मृद, मृदा इत्यादी.

शब्दकोशात शब्द देताना प्रत्येक वर्णाखाली त्या वर्णाने सुरू होणारे सर्व शब्द दिलेले असतात आणि हा वर्णक्रम वर दिलेल्या वर्णमालेप्रमाणे असतो. या रचनेला अकारविल्हे म्हणतात. ही रचनापद्धत लक्षात घेऊनच शब्दकोशाचा वापर करावा लागतो.



## शब्दार्थ

(शब्दांचे अर्थ पाठातील संदर्भानुसार दिले आहेत.)

### अ

**अग्रलेख** – वर्तमानपत्रातील मुख्य लेख
**अनित्य** – नित्य नसलेले, क्षणिक
**अपवाद** – नियमात न बसणारी गोष्ट
**अप्रतिम** – अजोड, अद्‌वितीय, उत्कृष्ट
**अविश्रांत** – विश्रांती न घेता, सतत
**असह्य** – सहन न होणारे
**असिधाराव्रत** – अवघड साधना, प्रखर नेम
**अस्मानी-सुलतानी** – दैवी व राजकीय संकट
**अंकी** – मांडीवर

### आ

**आगळीक** – कुरापत, खोडी
**आटोकाट** – पुरेपूर

**आत्मोत्कर्ष** – स्वत:चा उत्कर्ष
**आरोहावरोह** – (आवाजाचे) चढ-उतार
**आवेग** – भावनांचा तीव्र उद्रेक
**आक्षेपार्ह** – दूषण देण्याजोगे
**आंगवणे** – स्वाधीन असणे

**उ**

**उटीव** – 'उठव' या शब्दाचे बोलीभाषेतील रूप
**उत्कट** – तीव्र, आवेगपूर्ण
**उत्पात** – अपशकुन
**उभयपितर** – आईवडील (दोघे)

**ए**

**एतद्देशीय** – या देशातील

**ओ**

**ओजस्वी** – आवेशपूर्ण, तेजस्वी
**ओसंडणे** – भरून वाहणे, सांडणे, उतू जाणे, पूर येणे
**ओळणे** – पाझरणे, ओलावणे
**ओंगळवाणा** – घाणेरडा

**क**

**करुणाकर** – कृपा करणारा
**कल्पवल्ली** – हवे ते देणारी काल्पनिक वेल
**कशापाई** – 'कशासाठी' या शब्दाचे बोलीभाषेतील रूप
**काचा कसणे** – धोतराचा ओचा (सोगा) खोचणे
**कारवा** – वृक्षाचे नाव
**कारवानी घोडा** – धूर्त घोडा
**कॉम्रेड** – साम्यवादी विचारसरणीचा कार्यकर्ता.

**ख**

**खडतर** – त्रासदायक

**खरपूस** – कडक, खरमरीत

**खांड** – पिवळसर, हलक्या प्रतीची साखर

**खिजगणती** – गणती, मोजदाद

**ख्योळ** – 'खेळ' या शब्दाचे बोलीभाषेतील रूप

**ग**

**गमनमार्ग** – निघून जाण्याचे मार्ग

**गर्द** – दाट

**गुमान** – मुकाट, न बोलता

**ग्लानी** – घेरी, चक्कर

**घ**

**घ्येवाचं** – 'घ्यायचे' या शब्दाचे बोलीभाषेतील रूप

**च**

**चिंताक्रांत** – काळजीने ग्रस्त

**ज**

**जागरूक** – दक्ष

**जाणीव** – समज, ज्ञान

**जीवश्च कंठश्च** – अतिशय प्रिय

**ट**

**टिमटिमणे** – लुकलुकणे, चमकणे

**ड**

**डिक्शा** – कोवळे देठ

**डोळ्यांतील वाळवंट** – निस्तेज डोळे

**ढ**

**ढब्बू** – जुने दोन पैशाचे नाणे

त

**तपणे** – तपश्चर्या करणे

**तमा** – पर्वा, फिकीर

**तन्मयता** – तल्लीनता

**तल्खली** – तडफड, दाह

थ

**थुडी** – 'थोडी' या शब्दाचे बोलीभाषेतील रूप

द

**दिगंत** – सर्व दिशा

**दिडकी** – पूर्वीचा एक पैसा

**दितीयाच** – 'देतेस' या शब्दाचे बोलीभाषेतील रूप

**दील** – 'देईल' या शब्दाचे बोलीभाषेतील रूप

**दूड** – स्त्रियांचे एक कंठभूषण

**दंडक** – नियम

ध

**धनत्तर** – बलिष्ठ, थोर

**धरा** – धरणी

न

**नगुसा** – 'नकोसा' या शब्दाचे बोलीभाषेतील रूप

**न देही** – देतही नाही

**निका** – खरा

**निघोट** – अतिशय स्पष्ट

**निस्तुला** – जिची तुलना करता येत नाही अशी, अतुलनीय

**निःस्पृह** – निरिच्छ, निरासक्त

**निवर्तणे** – मृत्यू पावणे

प

**पर्व** – उत्कर्षाचा काळ, जुळून आलेला योग

**पहाडी** – उच्च, खणखणीत आवाज

**पायजी** – 'पाहिजे' या शब्दाचे बोलीभाषेतील रूप

**पात्र-करी** – योग्य हाती

**पालुपद** – वारंवार म्हणणे

**पुरुषसिंह** – पराक्रमी माणूस

**पंकसंपर्के** – चिखलाच्या संपर्कात

**प्रतिभावंत** – बुद्धिमान

**प्रतिष्ठा** – मान, कीर्ती

**प्रतिज्ञा** – निश्चय.

**प्रमाद** – चूक

**प्रमोद** – आनंद

**प्राप्य** – मिळण्याजोगे

**प्रासादिक** – सुबोध रचनेतील (पदे)

फ

**फुलोरा** – फुलांचा बहर

ब

**बगाला** – 'बघायला' या शब्दाचे बोलीभाषेतील रूप

**बराकी** – मोठ्या आकारातील खोल्यांची चाळ, छावणी

**बहुश्रुत** – खूप ऐकलेला, वाचलेला

**बुद्ध्या** – मुद्दाम, जाणूनबुजून

**बोलबाला** – नावलौकिक

भ

**भगुली** – पातेली

**भस्कं** – छिद्रे

**भाईर** – 'बाहेर' या शब्दाचे बोलीभाषेतील रूप

**भुक्की** – पूड

**भ्या** – भय, भीती

म

**मकरंद** – फुलातील मध

**मनस्वी** – मनापासून

**मातब्बर** – प्रतिष्ठित, धनवान

**मानदंड** – महानतेचे, प्रतिष्ठेचे प्रतीक

**मोहमयी** – मोहात पाडणाऱ्या

**म्हंजी** – 'म्हणजे' या शब्दाचे बोलीभाषेतील रूप

य

**यीना** – येईना

**यीवपातूर** – 'येईपर्यंत' या शब्दाचे बोलीभाषेतील रूप

र

**रागदारी** – जनमनरंजनास योग्य असा आरोह-अवरोहयुक्त स्वरसमूह

**राष्ट्राय इदं न मम** – हे राष्ट्राचे आहे, माझे नाही

**रिझवणे** – रंजन करणे, आनंदित करणे

**रियाझ** – (गाण्याचा) सराव, साधना

ल

**लक्ष्मीचा फेरा** – लक्ष्मीची कृपा

**लुब्ध** – आसक्त, लोभावलेला

व

**वत्सल** – प्रेमळ, मायाळू

**वाकळ** – गोधडी

**वायुवीची** – वायुलहरी

**विभवे** – वैभवाने

**विष्कंभक** – नाटकातील दोन अंकांच्या मध्ये पुढील कथानकाची सूचना देणारा प्रवेश

**वेठ** – पैसे न देता करून घेतलेले काम

**व्रतस्थपणे** – नेम पाळण्याच्या केलेल्या निश्चयाप्रमाणे

**श**

**शब्द मोठा होणे** – शब्दाचा अर्थ विस्तारणे

**शाखाविस्तार** – व्याप

**शिल्पकार** – शिल्पाकृती घडवणारा कारागीर

**श्रांत** – थकलेला

**स**

**सनसनाटी** – खळबळजनक

**सराई** – विश्रांतिस्थान, धर्मशाळा

**सस्यश्यामल** – पिकांनी हिरवीगार झालेली भूमी

**संस्कार होणे** – इष्ट गोष्टीचा ठसा उमटणे

**संसृती** – संसारक्रम

**सांच्याला** – 'संध्याकाळी' या शब्दाचे बोलीभाषेतील रूप

**सुदिक** – 'सुद्धा' या शब्दाचे बोलीभाषेतील रूप

**सुदिवर** – 'शुद्धीवर' या शब्दाचे बोलीभाषेतील रूप

**सौरभ** – सुगंध

**स्कंधी** – खांद्यावर

**स्वेदबिंदू** – घामाचे थेंब

**ह**

**हरितवसना** – हिरवे वस्त्र परिधान केलेली (पृथ्वी)

**हातरी** – बांबूची चटई

**हुबा** – उभा

**हैवान** – पशू

**हृदयंगम** – मोहक, चित्ताकर्षक, मनोहर

**क्ष**

**क्षात्रतेज** – शौर्य, वीरता, लढाऊपणा

**ज्ञ**

**ज्ञानार्थ** – ज्ञानप्राप्तीसाठी

# वाक्प्रचार / शब्दसमूह

अ

**अक्काबाईचा फेरा येणे** - दारिद्र्य येणे.

**अठरा विश्वे दारिद्र्य असणे** - जवळ जवळ पूर्ण दारिद्र्य असणे.

**अभ्यासाची गारगोटी होणे** - अभ्यास थांबणे.

आ

**आकांत करणे** - धावा करणे.

**आघाडी सांभाळणे** - नेतृत्व करणे.

**आंबट तोंड, लांबट चेहरा करणे** - नावड, निरुत्साह इत्यादी भाव चेहऱ्यावर दाखवणे.

क

**कंबक्ती भरणे** - मोठी शिक्षा भोगण्याचा प्रसंग ओढवणे.

**कान लावून ऐकणे** - लक्षपूर्वक ऐकणे.

**काळरात्र ठरणे** - भयंकर संकटाची रात्र ठरणे.

**कृतकृत्य होणे** - केलेल्या कृत्यामुळे धन्य होणे.

घ

**घोट्या मारणे** - घोटवणे, सराव करणे.

ज

**जिवाची तल्खली होणे** - जिवाची तरफड होणे.

**जिवात जीव येणे** - हायसे वाटणे, स्वस्थता वाटणे.

**जिवापाड प्रयत्न करणे** - अतिशय कष्ट घेऊन प्रयत्न करणे.

**जीवनाचा गाडा ओढणे** - अनिच्छेने जगण्याचा प्रयत्न करणे.

**जीव मुठीत धरणे** - संकटातून स्वतःचा जीव वाचवणे.

**जीव मोकळा होणे** - संकट टळल्याचे समाधान होणे.

**जीव रडकुंडीला येणे** - त्रासून जाणे.

ड

**डोळ्यात जाळ पेटणे** - संतापाने डोळे लाल होणे.

त

**तरणोपाय नसणे** - अन्य चांगला उपाय नसणे.

**तोंडचे पाणी पळणे** - घाबरून जाणे.

**तोंड वेंगाडणे** - मदत मागणे, याचना करणे.

द

**दिलासा मिळणे** - धीर मिळणे.

ध

**धडकी भरणे** - फार घाबरणे.

न

**नजर वेधून घेणे** - लक्ष आकर्षून घेणे.

**नतमस्तक होणे** - नम्रतेने मान खाली झुकवणे.

**नाकी दम येणे** - धाप लागणे, दमछाक होणे.

प

**परिस्थितीला शरण जाणे** - परिस्थितीपुढे हार मानणे.

**पाचावर धारण बसणे** - भीतीने गांगरून जाणे.

**पायदळी तुडवणे** - अपमानित करणे.

**प्रतीक्षा करणे** - वाट पाहणे.

**प्रयत्नाची शिकस्त करणे** - निकराचे प्रयत्न करणे.

**प्राण कंठात येणे** - अतिशय घाबरून जाणे, फार चिंता पडणे.

भ

**भंडावून सोडणे** - त्रासून टाकणे.

म

**मन भारावून जाणे** - मन आनंदाने भरून जाणे.

**माती पेटून उठणे** - निद्रिस्त मनात जागृती उत्पन्न होणे.

**मान विकणे** - प्रतिष्ठा घालवणे.

**मीठभाकर गोड करून खाणे** - आहे त्यात समाधान मानणे.

**मुलाहिजा न राखणे** - पर्वा न करणे.

**मुसंडी मारणे** - अतिशय वेगाने घुसणे.

**व**

**वेठीस जाणे** - जमीन मालकाकडे विनामोबदला काम करणे, याला वेठ काम असे म्हणतात. यावरूनच वेठीस धरणे हा वाक्प्रचार रूढ झाला आहे.

**श**

**शर्थ करणे** - पराकाष्ठा करणे, कसोशी, कमाल, पराक्रम

**ह**

**हृदयात कालवाकालव होणे** - मन बेचैन होणे.

**हृदयाला स्पर्शून जाणे** - मनाला जाणवणे.



टिपा –

- **उस्ताद अल्लादिया खाँ साहेब**

  जयपूर घराण्याचे ज्येष्ठ गायक. मोगूबाई कुर्डीकर यांना त्यांनी १९३४ साली गंडाबंधन करून तालीम दिली. १९४६ साली खाँसाहेब निवर्तले.

- **कॉमन्स सभा**

  हे ब्रिटिश संसदेचे कनिष्ठ सभागृह आहे. भारतीय संसदेची 'लोकसभा' आणि ब्रिटिश पार्लमेंटमधील 'कॉमन्स सभा' (हाऊस ऑफ कॉमन्स) यांचे स्वरूप जवळजवळ सारखे आहे.

- **गॉर्की मॅक्झिम**

  रशियातील प्रसिद्ध लेखक. 'आई' ही त्यांची कादंबरी १९०७ साली प्रसिद्ध झाली. क्रांतिकारक मानवतावादाचा प्रश्न त्याने कादंबरीत मांडला आहे. जगातील ३८ भाषांत या कादंबरीचे भाषांतर प्रसिद्ध झाले आहे.

- **गीतारहस्य**

  मंडालेच्या तुरुंगात असताना (१९१०–११ साली) लो. टिळकांनी 'श्रीमद्भगवद्गीतारहस्य' हा ग्रंथ लिहिला. त्याच ग्रंथाला त्यांनी 'कर्मयोगशास्त्र' असेही म्हटले आहे. हा ग्रंथ म्हणजे गीतेवरील भाष्य असून ते कर्मयोगपर आहे. पूर्वीची भाष्ये व टीका बाजूला ठेवून गीतेचे स्वतंत्र पारायण करून टिळकांना गीतेचा जो बोध झाला तो त्यांनी त्यात प्रतिपादन केला आहे. त्यांच्या मते गीता निवृत्तिपर नसून ती प्रवृत्तिपर आहे.

## गोंडल स्टेट

गुजरात राज्याच्या राजकोट जिल्ह्यातील तालुक्याचे ठिकाण. पूर्वीच्या गोंडल संस्थानची राजधानी.

## छापखाने, केशव रामचंद्र (१८७५-१९४०)

हे नामांकित वकील व सार्वजनिक कार्यकर्ते म्हणून प्रसिद्ध होते. त्यांचे वक्तृत्व अमोघ होते. त्यांचे 'स्वाध्याय ज्ञानेश्वरी' हे पुस्तक प्रसिद्ध आहे.

## देवल, गोविंद बल्लाळ – (१८५५ – १९१६)

प्रसिद्ध नाटककार, नाट्यदिग्दर्शक देवलांनी इंग्रजीवरून तीन, संस्कृतवरून तीन व एक स्वतंत्र अशी एकूण सात नाटके रचली. संशयकल्लोळ, मृच्छकटिक आणि सं. शारदा ही नाटके साहित्यिक आणि प्रायोगिकदृष्ट्या अद्वितीय ठरली. त्यांनी अल्पकाळ शिक्षकाचा व्यवसाय करून हयातभर नाट्यसेवेला वाहून घेतले.

## पद्म

'एक संख्या. ही नेमकी किती अंकी संख्या आहे या विषयी आज उपलब्ध संदर्भ ग्रंथात वेगवेगळी माहिती मिळते. त्यामुळे पद्मचा अर्थ 'एक मोठी संख्या' एवढाच घ्यावा.'

## मोगूबाई कुर्डीकर (जन्म १९०४)

जयपूर घराण्याच्या भारतीय कीर्तीच्या ज्येष्ठ गायिका. अनेक नाटकांमधील त्यांची कामे आणि गाणी त्या काळी गाजली. लयप्राधान्य हे मोगूबाईंच्या गाण्याचे खास वैशिष्ट्य. मोगूबाईंना १९६८ साली संगीत नाटक अकादमीचे पारितोषिक, १९८० साली संगीत रिसर्च अकादमीचे (कोलकता) पारितोषिक, पद्मभूषण असे अनेक मानसन्मान मिळाले. आजच्या अग्रगण्य गायिका किशोरी आमोणकर या त्यांच्या कन्या व शिष्या होत.

